


नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**



# नवभारत

वर्ष ५८। अंक। १२। सप्टेंबर २००५
(प्रकाशन : ऑगस्ट २००६)

## जोगोंडोर

'महाराष्ट्र नाटकवेडा आहे', हे वाक्य आता पुनःपुनः सांगून कंटाळवाणे होऊन गेले असले, तरी खरे आहे. परंतु हे नाटकवेड, महाराष्ट्रांचा इतिहास पाह जुने आहे, असे म्हणता येत नाही. लळीते, तमाशे, खेळ आणि कीर्तने यांचा समावेश नाटकाच्या क महाराष्ट्रात पुरातन काळापासून चालत ता येईल. रंगभूमीवर पडदे लावून, देखावे संहितेचे निरनिराळ्या पात्रांच्या संभाषणात जे नाटक, तिथपर्यंत पोचायला महाराष्ट्राल १८४३ मध्ये सांगलीच्या विष्णुदास भाव्यांनी क अनुकरणाने काही खेळ बसवले, त्यामुळे आज मराठी भूमीचे जन्मसाल आपण १८४३ मानतो व विष्णुदास भाव्याना नाट्यकलेच्या जनकाचा मान देतो.

## गल्लत घेतलेली झेप

तंत्रज्ञान आणि धर्म या दोन विचारधारा जगातील अनेक भागात व निरनिराळ्या काळी उत्पन्न झाल्या. परंतु, विज्ञानाचा जन्म इतिहासात एकदाच व एकाच ठिकाणी झाला. ग्रीसमध्ये इ.स.पू. ६०० विज्ञान जन्माला आले. तंत्रज्ञान व धर्म यांच्यापेक्षा नाची स्थिती असण्याचे कारण हेच की, वैज्ञानिक विक विचार आहे. आम्ही वर जे म्हटले आहे की, वि ध्ये उदयास आले, त्यावर बहुतेक पंडितांचे एक मत तंत्रज्ञान यांच्यात भेद नाही, असे जे विद्वान मानत णणे मान्य नाही. विज्ञानाच्या स्वभावाचे आकलन ण्यासाठी विज्ञानाच्या उदयाच्या संबंधातील ही अनन्यसाधारण वस्तुस्थिती नीटपणे नोंदवून घेणे जरूर

## आदिवासी लोकसाहित्याचे स्वरूप

आदिवासी लोकसाहित्य खऱ्या अर्थाने लोकसाहित्याचे स्वरूप उलगडवून दाखविण्याची क्षमता असलेले आहे. ते आदिम म्हणजे अतिप्राचीन तर आहेच, त्याचे कूळ आणि मू गेही अवघड आहे. ते मौखिक स्वरू लिखित लोकसा प्रश झालेला दिसत ... हित्य संकलन समितीने हे काम जाणीपूर्वक घेणे गरजेचे आहे.

## तीर्थिकांचा तर्क

कै. तर्कतीर्थ जोशी यांचा व माझा त्यांच्या निधनापूर्वीच्या तिशय घनिष्ठ संबंध आला होता. संस्कृत व यी अनेकदा रंगतदार चर्चा होत असे. वंगीय 'तर्कतीर्थ' ही पदवी फार असामान्य अशी प्र ष्ट्रात व इतरत्र अनेक विद्वानांनी काव्यतीर्थ, पार्थ, तर्कतीर्थ या पदव्या मिळवल्या आहेत. मात्र लक्ष जोशी यांनी व भारतविद्या याविषयी अनेकदा रंगतदार चर्चा होत असे.







अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचलित मासिक

# नवभारत

वर्ष ५८। अंक। १२। सप्टेंबर २००५
(प्रकाशन : ऑगस्ट २००६)
आश्विन, शके १९२७
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-





## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै०शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि.सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि.सातारा).









अनुक्रमणिका



# नवभारत

जून-जुलै-ऑगस्ट २००५

(प्रकाशन जुलै २००६)

## अनुक्रम


मराठी रंगभूमी (जीर्णोद्धार)

- डॉ. श्री. मा. भावे १

आदिवासी लोकसाहित्याचे स्वरूप

- डॉ. भा. व्यं. गिरिधारी १४

थेल्सने घेतलेली झेप

- लेविस वोल्पर्ट (परिचायक : श्री. मा. भावे) २१

तीर्थिकांचा तर्क

- डॉ. मो. गो. धडफळे ३३










# जीर्णोद्धार

*लेखांक ९वा – 'मराठी रंगभूमी'*

*श्री. मा. भावे*

- १ -

'महाराष्ट्र नाटकवेडा आहे', हे वाक्य आता पुन:पुन: सांगून कंटाळवाणे होऊन गेले असले, तरी खरे आहे. परंतु हे नाटकवेड, महाराष्ट्राचा इतिहास पाहता, फार जुने आहे, असे म्हणता येत नाही. लळीते, तमाशे, गोंधळ, बहुरूप्याचे खेळ आणि कीर्तने यांचा समावेश नाटकाच्या कुळात केला तर नाटक महाराष्ट्रात पुरातन काळापासून चालत आले आहे असा दावा करता येईल. रंगभूमीवर पडदे लावून, देखावे उभे करून, निश्चित अशा संहितेचे निरनिराळ्या पात्रांच्या संभाषणातून प्रकटन करून होणारे जे नाटक, तिथपर्यंत पोचायला महाराष्ट्राला फार दिवस लागले. १८४३ मध्ये सांगलीच्या विष्णुदास भाव्यांनी कानडी नाटकांच्या अनुकरणाने काही खेळ बसवले, त्यामुळे आज मराठी रंगभूमीचे जन्मसाल आपण १८४३ मानतो व विष्णुदास भाव्याना नाट्यकलेच्या जनकाचा मान देतो.

रंगभूमी १९०३ साली साठीची झाली. ती संधी साधून श्री. आप्पाजी विष्णू कुलकर्णी (१८६९-१९४२) यांनी 'मराठी-रंगभूमि' हे पुस्तक लिहून प्रसिद्ध केले. पुस्तक लहान आकाराचे पण २६४ पानांचे आहे व त्याची किंमत १। रू. अशी आहे. पुस्तकाच्या सुरूवातीला 'रा.केसरीकार यांचा अभिप्राय', 'रा. सुधारक कर्ते यांचा अभिप्राय' व 'रा. रा. न. चिं. केळकर, बी.ए.एल्.एल्.बी मराठाकर्ते यांचा अभिप्राय' असे तीन अभिप्राय छापले असून ग्रंथाच्या शेवटी 'नाट्यकलेसंबंधाने विद्वानांचे विचार' या मथळ्याखाली त्या वेळच्या 'विविधज्ञान विस्तार', 'इंदुप्रकाश', 'सयाजी विजय', 'सुधारक' इत्यादी मासिका-साप्ताहिकातले उतारे दिलेले आहेत.

आप्पाजी विष्णू कुलकर्णी हे मूळचे चिकोडी, जिल्हा बेळगाव, येथील रहिवासी. ते पुण्याला आले व १९०० ते १९०८ या काळात लो.टिळकांचे लेखक म्हणून काम करीत होते. या काळातल्या टिळकांविषयीच्या आठवणींचे 'लोकमान्य टिळक यांची गेली आठ वर्षे' हे पुस्तक त्यांनी १९०९ साली प्रसिद्ध केले. या बाबतीत त्यांनी मोठेच धैर्य दाखवले, असे म्हटले पाहिजे. कारण, टिळक तेव्हा राजद्रोहाचा आरोप सिद्ध झाल्याने मंडालेच्या तुरूंगात होते. महाराष्ट्रात दडपशाहीचा वरवंटा फिरत होता. राष्ट्रवादी वर्तमानपत्रांच्या संपादकांना शिक्षा होत होत्या. रत्नागिरीच्या कलेक्टराने टिळकांची चित्रे घरात लावायला देखील बंदी केली होती. त्यातून १९०० ते १९०८ हा काळ टिळकांच्या आयुष्यातील धगधगता काळ होता. वंगभंगाची चळवळ, राष्ट्रवादाची चतु:सूत्री, सावरकरांची अभिनय भारत ही क्रांतिकारी संस्था, दासगुप्त्यांवर 'पिकेटिंग' ची चळवळ अशा गोष्टींनी वातावरण दुमदुमून गेले होते. आप्पाजी विष्णू यांना सदर पुस्तकावरून कैदखान्यात घालता येण्याजोगे होते. असो.

याखेरीज आप्पाजी विष्णू यांनी 'निबंधावलि' या पुस्तकाचे दोन खंड १९९८ व ९९ साली लिहिले. यातील निबंध अॅडम्स नावाच्या लेखकाच्या 'बिझिनेस हॅबिट्स' नावाच्या पुस्तकावरून घेतले होते. खेरीज 'मौजच मौज' नावाचा अनुवादित गोष्टींचा ग्रंथ त्यांनी १८९६ साली प्रसिद्ध केला. वर सांगितलेच आहे की 'मराठी रंगभूमि' हे पुस्तक १९०३ सालातले आहे.

मराठी नाट्यकला उदयाला येऊन १९०३ साली साठ वर्षे झाली होती. संगीत नाटके रंगभमीवर यायला लागूनही २४-२५ वर्षे झाली होती. सोकर बापूजी त्रिलोकेकर यांनी १८७९ साली 'नलदमयंती' हे नाटक

लिहिले व त्याच साली त्याचे प्रयोगही होऊ लागले. १९०३ साली भाऊराव कोल्हटकर यांचा अस्त झाला होता व बालगंधर्व रंगभूमीवर आले नव्हते. खाडिलकर अद्याप गद्य नाटके लिहित होते. त्यांचे पहिले संगीत नाटक 'मानापमान' त्यानंतर लिहिले गेले. राम गणेश गडकऱ्यांचे कर्तृत्व भविष्यात दडले होते. एकंदरीने १९०३ साली मराठी नाट्यकला एखाद्या वळणावर विसावल्यासारखी होती.

१८४३ पासून १९०३ सालापर्यंतच्या साठ वर्षांत रंगभूमीवर आलेल्या नाटकांचे कुलकर्णी यांनी तीन भाग पाडले आहेत. पौराणिक नाटके, बूकिश नाटके आणि संगीत नाटके. या सर्व कालखंडातील नाटके, नट, नाटक कंपन्या, नाटकांविषयी व्यक्त झालेले विचार या साऱ्याचा परामर्श त्यांनी चटकदार भाषेत व साक्षेपाने घेतला आहे. प्रस्तावनेत ते लिहितात, 'सांप्रत कशाप्रकारची नाटके रंगभूमीवर येत आहेत व मराठी रंगभूमीची एकंदर स्थिती कशी आहे याचे सामान्य स्वरूप वाचकांस कळावे या हेतूने हे पुस्तक मी लिहिले आहे. हे स्वरूप पूर्णपणे लक्षात यावे म्हणून गेल्या साठ वर्षांतील महाराष्ट्रातील नाटकमंडळ्यांचा इतिहास यास दिला आहे.'

- २ -

आपण इतिहासातील हकीकतींकडे बऱ्याच अंतरावरून पाहतो. त्यामुळे त्या वेळच्या घडामोडीतील हिणकसपणा आपल्या ध्यानात येत नाही व चमकदार घटक मात्र उठून दिसतात. वसंत शांताराम देसाई यांचा 'मखमलीचा पडदा' किंवा पु. श्री. काळे यांचे 'ललितकलेच्या सहवासांत' अशी पुस्तके वाचली की आपल्याला 'आमची वैभवशाली रंगभूमी; बालगंधर्व, केशवराव भोसले, दीनानाथ यांच्या संगीताने दुमदुमून गेलेली नाट्यगृहे; गंधर्वांनी रंगभूमीवर प्रवेश करताच घमघमून राहिलेला सुगंध; गणपतराव जोश्यांचे चेहऱ्यावरील स्नायून् स्नायू हलवून भावना व्यक्त करण्याचे अजब कौशल्य इ.' शब्दपंक्तीनी भारून गेल्यासारखे वाटते.आपण गंधर्वांच्या ऐन भरभराटीच्या काळात नाटके पाहिलेल्या आहिताग्नी राजवाड्यांचे आत्मचरित्र वाचले तर खाडिलकरांची पदे व गंधर्वांची घोळून गाणे म्हणण्याची पद्धत यांच्यावरील उपरोधिक शेरे वाचायला मिळतात व 'काय ती भाऊरावांची स्वर्गीय गायकी, चढा आवाज, देखणे व ऐटबाज सोंग' अशी स्तुती मनात भरते. एकंदरीने मागे वळून पाहायचे व त्या वेळेची स्थिती भरभराटीची होती अशी समजूत करून घ्यायची, हा मराठी स्वभावच झालेला दिसतो.

आप्पाजी विष्णू कुलकर्णी प्रस्तावनेत सांगतात, 'नाटक मंडळ्यांना द्रव्य मिळविण्याची लालूच लागल्यामुळे असो किंवा विद्वान व सुशिक्षित लोकांच्या हलगर्जीपणामुळे अथवा कर्तव्यपराङ्मुखते मुळे असो, लोकांची नाटकाविषयीची अभिरूची बिघडत चालली असून दिवसेंदिवस तिला अपायकारक वळण लागत चालले आहे, यात काही संशय नाही. असे सांगणारे एकटे विष्णू आप्पाजीच होते असे नाही. भरतनाट्य समाज नावाची संस्था १९०५ सालापासून नाट्यसंमेलने भरवीत असे. त्या संमेलनांच्या अध्यक्षांची भाषणे वाचली तर त्यात हाच सूर दिसून येतो. उदाहरणार्थ सहाव्या नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष प्रा. भानू हे म्हणाले होते, ' 'तिसरी अडचण नाटके लिहिणाऱ्या कल्पक व प्रतिभाशाली कवींची वाण ही आहे. चवथी नाटकातील म्हणजे नाटकाचा धंदा करणाऱ्या लोकातील काही उनाड लोक होत. इमाने इतबारे धंदा करूनही म्हातारपणी योगक्षेम चांगल्या रीतीने चालण्याची फारशी आशा नसल्यामुळे व स्वभावत: वृत्तिचांचल्य पुष्कळसे असल्यामुळे पगारासाठी मात्र काम करणारे काही लोक आज ही मंडळी तर उद्या ती मंडळी, याप्रमाणे माधुकरी वृत्तीने काळ कंठितात. शेवटी दुर्व्यसनांनी कुजलेल्या शरीराचा त्याग करून आपल्या इष्टमित्रांच्या शिव्याशापाचे अधिकारी होतात. पाचवी अडचण धंद्यात जितकी बरकत यावी तितकी येत नाही...' म्हणजे १९१० साली, कृ.प्र.खाडिलकरांचे 'स्वयंवर' गाजून राहिले असताना व बालगंधर्व अगदी भरात असतानाही एकूण रंगभूमीची परिस्थिती हलाखीचीच होती.

असे असले तरी या काळातील शिक्षित








समाजाला करमणूक काय ती नाटकाचीच होती. कुलकर्णी प्रस्तावनेत लिहितात, 'हल्ली महाराष्ट्रात नाटकमंडळ्या अनेक झाल्या असून लोकांची नाटक पहाण्याकडेही बरीच प्रवृत्ती झाली आहे. त्यामुळे दरमहा शे-पाचशे रूपये मिळवणारा सरकारी नोकर असो किंवा स्वतंत्र उद्योगावर दहा पाच रूपये पोटाला मिळविणारा साधारण गरीब मनुष्य असो, वर्षाकाठी त्याच्या ऐपतीप्रमाणे प्राप्तीचा थोडा बहुत भाग तरी नाटकाकडे जातोच. एवढेच नव्हे तर शहरातील कित्येक लोकांना नाटकाची एक प्रकारची चटक लागल्यामुळे आव्याच्या मानाने या कामाकडे त्यांचा जास्त पैसा खर्च होत असतो.' लोकांना नाटकाचा केवढा नाद लागला होता हे सांगताना भाऊराव कोल्हटकरांच्या चरित्रात शंकरराव मुजुमदारांनी म्हटले आहे की, विधवा स्त्रिया स्वतःच्या जवळचे किडुकमिडुक सावकाराकडे गहाण ठेवून नाटकाची तिकिटे विकत घेत.

- ३ -

सुमारे ऐंशी वर्षे, म्हणजे १८५० सालापासून १९३० पर्यंत, महाराष्ट्राला नाटकाचे वेड लागले; खर्डेघाश्या लेखकापासून तो देवल, खाडिलकर, गडकरी यांसारख्या वाङ्मयसम्राटापर्यंत प्रत्येकाने नाटक लिहिण्याचा उपक्रम केला; 'चित्तचक्षुचमत्कारि' असे विलक्षण नाव घेतलेल्या नाटकमंडळीपासून 'पडळकर मंडळी' असे बाळबोध नाव धारण करणाऱ्या नाटक मंडळीपर्यंत शंभराहून अधिक नाटक कंपन्या होऊन गेल्या; 'सुबकसा पटका शिरि बांधिती। वर तुरा किती ऐटित खोविती॥ फिरविती सुरमा नयनातही।' असा नटपणा मिरविणारी हजाराहून अधिक सोंगे वावरत गेली; नाट्यव्यवसायाचे महत्त्व इतके वाढले की 'त्या करमणुकीवरून समाजाच्या एकंदर हालचालीच्या नाड्या कशा रीतीने वाहत आहेत याचा अंदाज करिता येतो,' असे जाणकारांना वाटले; अशा या नाटकाची जातकुळी तमाशा व लळीत यांच्यापर्यंत नेऊन भिडविता येते. 'लळीतामध्ये आरंभी देवादिकांची सोंगे आणून दशावतारातील थोडी थोडी ईश्वरलीला करून दाखवीत असत, व शेवटी रामाकडून रावणाचा वध करवून लळीत संपवीत असत.'(२) 'तमाशे हे मुसलमानी अमदानीत सुरू झाले असून बादशाही वैभवाबरोबर जे काही चैनीचे व करमणुकीचे प्रकार अस्तित्वात आले त्यात त्यांची गणना होते... तमाशाचे सामान्य स्वरूप म्हणजे पाठीमागे डफ तुणतुण्यावर गाणे, पुढे नाच्यापोराचा नाच, आणि मधूनमधून सोंगाची बतावणी हे होय.'(३) 'लळीते व तमाशे याखेरीज गोंधळाचाही थोडाबहुत संबंध मराठी रंगभूमीशी पोचतो... आरंभी घातलेल्या साध्या पोषाखानेच पुढे येऊन बोलणे चालणे वगैरेत एखाद्याची नक्कल हुबेहुब वठवून देत.'(७)

'रंगभूमीवर मराठी नाटके करण्याची सुरूवात प्रथमतः सांगलीचे रा. विष्णुपंत भावे यांनी केली. सांगलीत इ.स.पू.१८४२ मध्ये उत्तर कानडा प्रांतातील कोणी भागवत नावाची मंडळी आली होती... यावेळी कर्नाटकात कृष्णपारिजात वगैरे खेळ कानडी भाषेत होत असत; तशाच धर्तीवर हा खेळ होता. या खेळात पात्रे पुढे येऊन गावून नाचत असत व थोडेबहुत भाषण करून त्यात प्रेक्षकांना रिझवीत असत.'(९) या खेळामुळे सांगलीकर चिंतामणराव पटवर्धन यांनी भाव्यांना असाच खेळ बसविण्याची सूचना केली. भाव्यांनी 'सीतास्वयंवर' हे आख्यान तयार केले. नंतर पात्रे जमवून व त्यांना नाटकाचे थोडेफार शिक्षण देऊन सदर प्रयोग इ.स.पू.१८४३ मध्ये सांगलीकरांपुढे करून दाखविला.

भाव्यांच्या या उत्कर्षाचा काहीं कुटिल लोकांना दुस्वास वाटू लागला. 'नटवेष घेणे धर्मबाह्य आहे, असे म्हणून भावे यांच्या नाटकातील मंडळीस दोन तीन वेळ भर पंक्तीतून उठवून त्यांनी बहिष्कार घालण्याची खटपट केली.' पण चिंतामणराव पटवर्धन यांच्या पदरचे पंडित 'वे.शा.स.रा. गोपीनाथशास्त्री आगाशे यांनी शास्त्राचे पुष्कळ आधार दाखवून नटवेष घेणे हा दोष नाही असे सिद्ध केले. यानंतर वरील मंडळी खजिल होऊन त्यांनी भावे यांचे नाव सोडून दिले.'(११-१२)

भाव्यांच्या नाटकाच्या सुरूवातीला सूत्रधार पडद्याच्या बाहेर उभा राहून मंगलाचरण व ईशस्तवन




अनुक्रमणिका

करी. त्यानंतर विदूषक पडद्यातून बाहेर येई व सूत्रधार त्याला नाटक कोणते करावयाचे ते सांगून पात्रांची सिद्धता करावयास सांगे. नंतर गजानन महाराजांचे स्तवन होऊन पडदा उघडावयाचा व आत गजाननाची स्वारी आसनावर बसलेली दिसे, सूत्रधाराने गजाननाची प्रार्थना केल्यावर गणपती 'कार्य निर्विघ्नपणे पार पडेल,' असा आशीर्वाद देई. नंतर सरस्वती येऊन 'पात्रांचे ठायी धीटपणा व वक्तृत्वशक्ती असावी.' असा वर देत असे.(१३) त्यानंतर सूत्रधार पडद्यातून नाटकाची माहिती देत असे. 'आख्याने सर्व पौराणिक असल्यामुळे बहुतेक सर्व नाटकांतून देवांची एक कचेरी, राक्षसांची एक कचेरी व प्रत्येक पक्षाकडील स्त्रियांची एक कचेरी अशा कचेऱ्या होत व त्यातून उलट पक्षाचा पाडाव व नाश करून आपण कसा विजय मिळवावा याचीच बहुधा वाटाघाट होई. ही वाटाघाट चालताना एका पात्राने दुसऱ्या पात्रास 'सांगतो ऐक' म्हणावे व सूत्रधाराने पद्य म्हणून त्यातून त्याचा मनोभाव व्यक्त करावा.'(१४)

'देवांची कामे करणारे इसम आपआपल्या परीने भाषणात आवेश व वीरश्री दाखवीत; व राक्षसांची सोंगे करणारे इसमही आरडून ओरडून राळाच्या उजेडात तरवारीच्या फेका करून वीरश्री व्यक्त करीत. स्त्रियांच्या भाषणात साधारणपणे शृंगार व करूण हे दोन मुख्य रस असत. पैकी शृंगारापेक्षा करूण रस जास्त असून 'शिव शिव हे शंकरा' इ. दीर्घ स्वराची वाक्ये उच्चारून व धरणीवर अंग टाकून त्याची पूर्तता होई.'(१४)

'रंगभूमीवर कचेरीचा थाट म्हणजे चार-दोन खुर्च्या ओळीने घातल्या म्हणजे झाला. देवांची कचेरी याच खुर्च्यांवर; ती आटपली की, राक्षसांची कचेरी याच खुर्च्यांवर व राक्षसांची आटपली की स्त्रियांची कचेरी याच खुर्च्यांवर ! या सर्व प्रसंगी विदूषकास तेथे मांडणी करण्याकरिता किंवा काही लागले-सवरले तर ते देण्याकरिता उभे राहावे लागे; व देवास, राक्षसास किंवा स्त्रियांस हरएक प्रसंगी विदूषक म्हणजे एक तोंडी लावणेच होई.'(१५)

भाव्यांनी पौराणिक नाटकाची ही पद्धत घालून दिली. त्यांच्या नाटकात गोपाळराव मनोळीकर हे सूत्रधाराचे काम फार सुरेख करीत. यांच्या गाण्याची लोकांवर छाप पडे. रघुपती फडके नावाचा रूपाने चांगला व अभिनयात निपुण असा मुलगा स्त्रीवेष घेत असे. बापू ताके नावाचे धिप्पाड गृहस्थ राक्षसाचे काम करीत. भाव्यानी ही नाटक कंपनी १८६१ पर्यंत चालविली. १८५१ पासून पुढे त्यांनी आपल्या कंपनीचे दौरे कोल्हापूर, पुणे, मुंबई अशा ठिकाणी काढले. या धंद्यापासून 'किफायत विशेष झाली नाही; परंतु चार लोकांच्या ओळखी होऊन स्नेह जमला. रंगभूमीवर नाटके करण्याची ही नवीच टूम त्यांनी अस्तित्वात आणल्यामुळे महाराष्ट्रातील सर्व लोकांचे लक्ष तिकडे लागले व त्यांचे अनुकरण करून मागाहून कित्येकांनी तशा नाटकमंडळ्याही काढल्या.'(२०)

या कंपन्यापैकी सांगलीकर, आळतेकर, इचलकरंजीकर, कोल्हापूरकर या नावाजण्यासारख्या कंपन्या होत्या. या सर्वांचा उदय सांगली व त्याच्या आसपासच्या भागात झाला; कारण मूळ भाव्यांची कंपनी सांगलीत निघाली. त्यापासून फाटाफुटीने व अनुकरणाने नवीन कंपन्याही त्याच भागात झाल्या. ह्या कंपन्या जशा चोहोकडे फिरू लागल्या तशी लोकांना नाटकाची गोडी लागली आणि निरनिराळ्या ठिकाणी नव्या कंपन्या होऊ लागल्या.

सर्व कंपन्यांची 'सुभद्राहरण', 'वत्सलाहरण', 'रावणवध', 'हरिश्चंद्र नाटक' इ. नाटके भाव्यांनी घालून दिलेल्या पद्धतीनेच होत असत. प्रथम मंगलाचरण, नंतर गणपतिसरस्वतीचे आगमन व नंतर कथाभाग. नाटकाचे चालक कथाभागावरून भाषणे तयार करीत व त्यांच्या नकला करवून घेत. विदूषकाचे काम करणारे इसम 'लोकांना हसवायचे' या समजुतीने कोणत्याही प्रसंगी कोणीकडून तरी लोकांना हसवीत असत. कंपनीतील आचारी, पाणके असे खालच्या दर्जाचे लोक राक्षसाचे काम करीत. हे लोक चेहऱ्यावर रंगीबेरंगी पट्टे ओढीत; तोंडात पत्र्याचे व हस्तीदंती मोठमोठे दात लावीत; गळ्यात काचेच्या मण्यांच्या, भेंडफळांच्या माळा








घालीत; कमरेभोवती धोतरे व लुगडी गुंडाळीत; डोकीवरून लांब जटा सोडीत व हातात नागवी तलवार घेत. असे हे सोंग सजले म्हणजे राळाच्या सरबत्तीत आरडा-ओरडा करीत व तरवार खेळत रंगभूमीवर प्रवेश करीत. त्यानंतर राक्षसांचा राजा आणखीच भयंकर वेष करून थयथयाट करीत येई.या ओरडण्याने प्रेक्षकांच्या कानठळ्या बसून जात आणि मुले भीतीने थरथरा कापत. राक्षसांच्या या धांगडधिंग्यामुळे पौराणिक नाटकास कोणी 'अलाला' व कोणी 'तागडथोम' नाटके म्हणत. असे म्हणण्याचे कारण हे की, राक्षस बाहेर आला की, सूत्रधार झांज वाजवून "आला-आला" व "तागडथोम" असे शब्द म्हणत असे.

-४-

'विश्वविद्यालयाची स्थापना होऊन महाराष्ट्रात इंग्रजी शिक्षण सुरू झाल्यावर त्या शिक्षणाचे जे काही परिणाम झाले आहेत त्यातच आमच्या लोकांची बूकिश, नाटकांकडील प्रवृत्ती हा एक परिणाम होय. कॉलेजमध्ये शेक्सपियरादी आंग्लकवींच्या व कालिदासादि आमच्या कडील संस्कृत कवींच्या नाटकातील रसास्वाद चाखण्यासाठी संधी जेव्हा आमच्या लोकास मिळू लागली, तेव्हा लोकांमध्ये 'नाटक-ग्रंथ', 'नाटक प्रयोग' वगैरे विषयांसंबंधाची चर्चा सुरू होऊन आमच्यातील विद्वान् लोकांचे लक्ष तिकडे लागले; व कॉलेजातील विद्यार्थ्यांकडून चांगल्या चांगल्या इंग्रजी आणि संस्कृत नाटकांचे प्रयोगही होऊ लागले.'(३८)

पौराणिक नाटकात फक्त सूत्रधार गात असे. आता पात्रेच गाऊ लागल्याने सूत्रधाराचे काम संपुष्टातच आले. विदूषकाचा फाजिलपणा संपला व गाणी वाटून गेल्यामुळे नाटकांना व्यवस्थित रूप आले.

याच वेळी मुंबईत आलेल्या इंग्रजी नाटक कंपन्यांचे खेळ पाहूनही सुशिक्षितांच्या मनात अभिनयाची नवी जाणीव निर्माण झाली. इंगजी नाटकांची गोडी नवसुशिक्षितात वाढत होती त्याचवेळी इंग्रज अधिकाऱ्यात व विद्वानात संस्कृत नाटके, प्राचीन भारतीय संस्कृती यांच्या विषयीचे कुतूहल वाढत होते. 'मुंबईस कालिदास एल्फिन्स्टन सोसायटी' या नावाची एक मंडळी निघाली होती... या मंडळीने 'शाकुंतल' नाटकाचा प्रयोग इंग्रजीत केला. त्यात भाषणे फक्त इंग्रजीत होती, बाकी पोषाखाची वगैरे तऱ्हा आमच्या कडीलच होती... पूर्वीच्या स्थितीचे हुबेहुब चित्र वठविण्याकरिता ज्या ज्या देखाव्यांची जरूर होती व जे जे जिन्नस पाहिजे होते ते ते अतोनात पैसे खर्च करून आणले होते. शकुंतलेस वल्कले नेसावयास पाहिजे होती ती ४०० रू. खर्च करून मुद्दाम मद्रासहून आणाली होती; व पुष्पशय्येकरिता पुण्याहून फुलांच्या दोन वॅगन्स भरून नेल्या होत्या.(४०-४१)

'विद्यार्थ्यांना इंग्रजी नाटकांचे रहस्य समजून देण्याकरिता कॉलेजात काही युरोपियन नटही मुद्दाम बोलावीत असत. अशा तऱ्हेचे मिस एलूशिया मे व प्लेअर क्लो या दोन नटात एकदा डेक्कन कॉलेजमध्ये बोलावून व त्यांना ५०० रूपये देऊन त्यांच्याकडून काही नाटके वाचून घेतली होती असे सांगतात.(४१)

या संस्कृत व इंग्रजी नाटकांच्या परिशीलनाने व प्रयोग पाहिल्याने सुशिक्षित लोकांना नाटकप्रयोगात कोणत्या अडचणी येतात, पात्रांची योजना कशी करावी लागते, अभिनयाचा ठसा कसा उमटवावा अशा गोष्टींची चांगली माहिती झाली. आता पर्यंत ही संस्कृत-इंग्रजी नाटके कॉलेजातून किंवा हौशी लोकांच्या क्लबातून होत होती. पण १८७९ पासून व्यावसायिक रंगमंचावर ही नाटके आली. सांगलीकरांची नाटकमंडळी पुण्यास या वर्षी आली होती.तिने संस्कृत मृच्छकटिक नाटकाचे गद्यपद्यात्मक मराठी भाषांतर रंगभूमीवर करून दाखविले. 'थोरले माधवराव' व 'जयपाल' ही कीर्तन्यांची स्वतंत्र मराठी नाटके याच सुमारास रंगभूमीवर आली. 'सिंबेलाईन' या शेक्सपियरच्या नाटकाचे रावसाहेब वि.मो.महाजनी यांनी केलेले 'तारा' नावाचे भाषांतर इचलकरंजीकर मंडळीने केले. 'शशिकला व रत्नपाल' हे 'रोमिओ ॲण्ड ज्युलिएट' या नाटकाचे भाषांतर आहे. त्याचा प्रयोग ७९-८० साली 'पुणेकर नाटक मंडळी' ने केला.








'आर्योद्धारक नाटक मंडळी' म्हणून एक संस्था पुण्यातील नव्या विद्वानांच्या उत्तेजनाने निघाली. या मंडळीत गोविंदराव देवल व शंकरराव पाटकर हे दोघे खंदे नट होते. 'वेणीसंहार', 'अथेल्लो', 'तारा' (सिंबेलाईन) व 'किंगलियर' ही चार नाटके ही संस्था करीत असे. 'अथेल्लो' ह्या नाटकाचे भाषांतर महादेवशास्त्री कोल्हटकर यांनी केले होते. देवल अथेल्लोचे तर पाटकर यागोचे काम अप्रतिम करीत. 'याचा पहिला प्रयोग आनंदोद्भव थिएटरमध्ये झाला. तेव्हा ज्यांना ज्यांना तो पाहण्यास जाण्याची सवड मिळाली नाही त्यांना त्यांना मोठे वाईट वाटले; व रा. केरो लक्ष्मण छत्रे, शिवराम हरी साठे, बाबा गोखले वगैरेंच्या मध्यस्थीने 'फिरून हा खेळ दाखवावा' म्हणून मंडळीस वर्तमानपत्रातून विनंती केली. खास बोलाविण्यावरून मंडळी मुंबईस गेली व तिथेही तिने नाव मिळविले.'(४८)

पौराणिकनाटकातील पडद्यांवर देवादिकांची चित्रे असत. चित्रे भडक रंगात व ओबड-धोबड काढलेली असत. 'पण बूकिश नाटकांच्या प्रयोगात रस्ता, देऊळ, बाग, महाल, डोंगर, जंगल, नदी वगैरे निरनिराळ्या स्थळांची बरोबर कल्पना प्रेक्षकांच्या मनात उतरून देण्याचा प्रयत्न होऊ लागल्यामुळे पडद्यांवर ती ती स्थळे निघतील तितकी हुबेहुब काढू लागले. त्यातून काही काही नाटके प्रस्तुत काळची स्थळे, माणसे, प्रसंग वगैरेंवर रचली असल्यामुळे व नव्या इंग्रजी पद्धतीने चित्रकलेचे शिक्षण इकडील लोकांस मिळू लागल्यामुळे पडदे रंगविण्यातही सुधारणा झाली; मुंबईच्या सात-सात मजली इमारती व रस्ते आगगाडीच्या सडका, समुद्रातील बोटी व दिवे, घडाळ्यांचे उंच मनोरे, तारायंत्रांचे खांब, गिरण्यांची धुराडी, वगैरे देखावे त्यातून निघू लागले.'(५०)

कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपॉल मि. कँडी हे हौशी व नाटकप्रेमी होते. त्यांनी कॉलेजातील विद्यार्थ्यांकडून बूकिश नाटकांचे प्रयोग करून घेतले. पण ही नाटके भाषांतरित होती. मराठीत स्वतंत्र नव्या नाटकांची भर पडावी व विद्यार्थ्यांना दर वर्षी नवी नवी व सरस नाटके मिळावीत या हेतूने मि. कँडी यांनी 'आपल्या कॉलेजच्या विद्यार्थ्यांकरिता जो कोणी चांगले नाटक लिहिल त्यास १५० रूपयांचे बक्षिस देऊ' अशा अर्थाची जाहिरात इ.स.१८८५ साली वर्तमानपत्रातून प्रसिद्ध केली; व त्याप्रमाणे बक्षिसाकरिता काही पुस्तकेही आली.(५३) त्या वर्षाचे बक्षिस वासुदेवशास्त्री खरे यांच्या 'गुणोत्कर्ष' या नाटकास मिळाले व देवलांच्या 'दुर्गा' नाटकासही, बहुधा उत्तेजनपर, काही बक्षिस मिळाले.

कोल्हापूरची नरहरबुवा सवाही यांची नाटकमंडळी पौराणिक नाटके करीत असे. पण नरहरबुवांना बूकिश नाटके करावीशी वाटली व त्यांनी 'दुर्गा' हे नाटक बसवले. विनायकराव कवठेकर हे दुर्गेचे काम करीत. 'एका पतीच्या अभावी दुसरा पती करताना प्रेमपाशात गुंतून मनाची झालेली चंचलता, पहिल्या पतीची आठवण होऊन हृदयात सुटणारे काहूर व अखेर पहिला पती जिवंत आहे व त्याची आणि आपली भेट होत आहे, असे पाहून पूर्वीचा आपला अधीर स्वभाव, दुर्वर्तन, पश्चात्ताप वगैरे विकारांनी मनात उत्पन्न केलेला घोटाळा ही कामे रा. विनायकराव फारच बहारीची व हृदयास विव्हळ करून सोडण्यासारखी करीत होते.'(५७)

कोल्हापूरच्याच शाहूनगरवासी मंडळीनेही आपली 'तागडथोम' नाटकांची परिपाठी सोडून बूकिश नाटके उचलली. त्यासाठी त्यांना फर्ग्युसन कॉलेजातील प्रोफेसर वासुदेवराव केळकर व लो. टिळकांचे मित्र शंकर मोरो रानडे यांचे सहाय्य मिळाले. वासुदेवराव केळकर यांनी 'टेमिंग ऑफ धी श्रू' या शेक्सपियरच्या नाटकाचे 'त्राटिका' या नावाने भाषांतर केले होते. हे नाटक मुळात 'नाट्यकथार्णव' नावाच्या मासिकात प्रसिद्ध झाले. 'त्राटिका' हे 'शाहूनगरवासी' चे हातखंडा नाटक होते. बळवंतराव जोग, गणपतराव जोशी व गोविंदराव सुपेकर हे अनुक्रमे त्राटिका, प्रतापराव व पिल्या यांची बहारदार कामे करीत. 'प्रथमतः त्राटिका रंगभूमीवर आली








म्हणजे तिने पिंजारलेल्या केसांचा कसा तरी बुचडा बांधलेला पाहून, हातात लाटणे घेऊन वडिलधाऱ्या माणसांच्या अंगावर तिचे खिसकावणे ऐकून व बहिणीची रागारागाने गालगुची घेतलेली पाहून प्रेक्षकात टाळी न देणारा इसम क्वचितच भेटेल. तसेच प्रतापरावाचा लग्नाच्या वेळचा सतरा ठिगळे लावलेला पोषाख, मामाबरोबर त्याचे रोखठोकीचे भाषण, पिल्यावरील करडा अंमल, त्राटिकेने ऊन्ह म्हटले की आपण सावली म्हणायचे हा त्याचा बहाणा व शेवटी युक्तिप्रयुक्तीने त्राटिकेची आनंदी बनून त्या नवराबायकोचे आनंदाने चाललेले भाषण ऐकून ज्याची चित्तवृत्ती आनंदी होत नाही असा प्रेक्षकात एकही इसम निघणार नाही.(५९)

शाहूनगरवासीचे 'हॅम्लेट' हे नाटक गाजले होते. गणपतराव जोशी हॅम्लेटचे काम उत्कृष्ट करीत. 'आपल्या बापाच्या पिशाच्चाच्या दर्शनाने मनात उद्भवलेली भीती, चुलत्याच्या निंद्य कृत्याबद्दल त्यास प्रायश्चित्त देण्याचा निश्चय, आपल्या चुलत्याबरोबर आपल्या आईच्या झालेल्या द्वितीय संबंधाबद्दल तिटकारा, सूड कसा घ्यावा याचा विचार, पावलोपावली मनाची झालेली चंचलता व अस्थिरबुद्धि, खऱ्या मित्राबद्दल प्रेम, कार्य साधण्याकरिता पांघरलेले वेड वगैरे प्रसंगांची त्यांची आत्मगत भाषणे व मुद्रेवर दुःख, शोक प्रगट करण्याचे त्यांचे कौशल्य ही अप्रतिम आहेत.'(६१) शाहूनगरवासीच्या 'झोपी गेलेला जागा झाला', 'प्रणयविवाह', 'झुंझारराव' इ. नाटकाबद्दल सांगून कुलकर्णी म्हणतात की, 'आजमितीला बूकिश नाटके करणारी हीच का ती चांगली कंपनी असून तिच्या तोडीची दुसरी कंपनी नाही.'(६२)

बूकिश नाटके बहुशः इंग्रजीवरून व काही प्रमाणात संस्कृतवरून घेतली होती; पण थोडक्याच दिवसात मराठीत स्वतंत्र नाटके लिहिली जाऊ लागली. त्यात ऐतिहासिक व चरित्रवजा नाटके पुष्कळ होती. ही नाटकेच लिहिली जाण्याचे कारण, कुलकर्ण्यांच्या सांगण्याप्रमाणे, 'पाश्चात्त्य तेवढे चांगले, आमचे ते सर्व वाईट' अशा सारखे वेडगळ विचार विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या मार्मिक लेखांमुळे विलयास जाऊन आमच्या पूर्वजांचे व आमच्या इतिहासाचे आम्ही अभिमानी बनलो, हे आहे.(७०) या नाटकात 'झाशीची राणी लक्ष्मीबाई इचे बंड' या नावाचे नाटकही होते. हे आळतेकर मंडळी करीत असे. पुढे चाफेकरांनी रँडचा खून केल्यावर जी दडपशाही झाली तेव्हापासून कंपन्या हे नाटक करीत नाहीशा झाल्या. कुलकर्णी सांगतात की, या ऐतिहासिक व चरित्रात्मक नाटकात इतिहास किंवा चरित्र फारच थोडे असे. त्यामुळे अशा नाटकास 'फार्स' असे थट्टेचे नाव पडले. गणपतराव भिडे नावाच्या गृहस्थांनी नारायणरावाच्या खुनावर नाटक लिहिले त्याचे नावच 'नारायणरावाच्या मृत्यूचा फार्स' असे होते.

'सामाजिक विषयावरील अगदी पहिले नाटक म्हणजे 'मोर एल्.एल्.बी.चा फार्स' हे होय. या फार्सात इंग्रजी शिक्षणामुळे आमच्या लोकांची हाडाची काडे बनून ते कसे निर्बल होतात, हे मुख्य दाखविले आहे. मोरेश्वर नावाच्या एका एल्.एल्.बी. परीक्षा पास झालेल्या इसमाचे पात्र यात घातले असून गर्भादानाचे वेळी तो निरूपयोगी ठरल्याबद्दल त्याच्या बायकोकडून त्याची टर उडवली आहे.'(८०) बूकिश नाटकातील हा प्रवाह म्हणजे सद्यःस्थितीचा आरसाच बनून राहिला होता. नारायण बापूजी कानिटकर (हे श्रीमती काशीताई कानिटकर यांचे चुलत सासरे) यांनी 'तरूणीशिक्षण' नावाचे नाटक लिहिले व त्या काळातील नवशिक्षित तरूणात सुधारणावादाचा जो 'सुळसुळाट' झाला होता त्याचा पाडाव करण्याचा प्रयत्न केला. स्त्रियांना हल्लीचे (१८९०च्या सुमाराचे) शिक्षण दिले म्हणजे त्या कशा बिघडतात हे या नाटकात विशेष रीतीने व्यक्त केले आहे. हे व्यक्त करताना भक्ष्माभक्ष्माचा विधीनिषेध न मानता मद्यमांसाच्या अतिरेकाने प्राणहानी करून घेणारे पदवीधर वकील; इंग्रजांच्या सर्व चालीरीती चांगल्या, त्यांचा धर्म चांगला, आपण सर्वस्वी त्यांचे अनुकरण केले पाहिजे असे म्हणणारे उतावळे सुधारक; तसेच सुधारणा हळूहळू... कराव्या, अनुकरण योग्य ते








करावे... असे म्हणणारे रिॲक्शनिस्ट्स; बूट स्टाकिंग, हाफ् जाकिटे, झगे घालणाऱ्या व नवऱ्याला कस्पटाप्रमाणे समजून स्वैर वर्तन करणाऱ्या सुशिक्षित स्त्रिया; स्त्रियांचे हायस्कूल (हे १८८४ साली निघाले), बंड गार्डन, आर्य महिला हॉटेल, प्रार्थनासमाज, ब्रह्मसमाज इ. निरनिराळ्या स्थलांची व पात्रांची योजना नाटककर्त्याने केली आहे... 'परांजपे कंपनी'ने या नाटकाचे प्रयोग जेव्हा पुण्याच्या रंगभूमीवर सुरू केले तेव्हा फारच चळवळ उडून सुशिक्षित व अशिक्षित अशा दोन्ही लोकांच्या झुंडीच्या झुंडी तो खेळ पाहाण्यास जात.

पुढे कुलकर्णी सांगतात की, प्रधान नावाचे एक नट या परांजपे कंपनीत होते. ते दारू म्हणून पाण्याच्या असंख्य बाटल्या हे नाटक करताना पीत. निरनिराळ्या प्रसंगी निरनिराळे चेहरे करण्यात यांचा हातखंडा असे. 'धनुर्वात', 'हटयोग', 'मद्यप्याचे प्राणोत्क्रमण' इत्यादी प्रसंगांचे यांच्या चेहऱ्याचे फोटो चित्रशाळेने घेतले होते व प्रसिद्ध केले होते.

१८९१ मध्ये संमतिवयाच्या कायद्याच्या बाजूने सुधारकांची व विरोधी बाजूने सनातन्यांची अशा चळवळींचा एकच कडाका उडाला होता. त्या वेळी 'राष्ट्रहितेच्छा' नामक मंडळीने 'संमती कायद्याचे नाटक' आर्यभूषण नाटकगृहात केले. यात ससून हॉस्पिटलात वैद्यकीय शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांनी चांगली कामे केली होती. या नाटकाच्या लेखकाचे नाव कुलकर्ण्यांनी दिलेले नाही, पण हे नाटककार नारायण बापूजी कानिटकरच होते.

पौराणिक नाटकांकडून बूकिश नाटकांकडे जे संक्रमण झाले ते फार झपाट्याने झाले असे म्हटले पाहिजे. १८७९ मध्ये 'शाकुंतल' नाटकाचा इंग्रजीत प्रयोग झाला तिथपासून १८९१ मध्ये 'संमती कायद्याचे नाटक' ह्या सद्य:स्थितीनिदर्शक नाटकाच्या प्रयोगापर्यंत रंगभूमीने अवघ्या १२ वर्षात मजल मारली; पौराणिक नाटके इतिहासजमा झाली यावरून दोन गोष्टी स्पष्ट होतात. पहिली म्हणजे १८५७ मध्ये मुंबई विद्यापीठ स्थापन झाल्यापासून अवघ्या ३४ वर्षात नवीन सुशिक्षितांनी समाजमनावर केवढा पगडा बसवला ही; व दुसरी, मराठी समाजाने किती झपाट्याने नाटकाच्या नव्या रूपाचा स्वीकार केला, ही.

- ५ -

बूकिश नाटकांच्या बरोबरच संगीत नाटकाचाही जन्म झाला. खरे तर पौराणिक नाटके देखील संगीत नाटकेच होती. परंतु सर्व गाणी एकटा सूत्रधारच गाई. निरनिराळ्या पात्रांनी आपापली गाणी गावीत ही प्रथा संगीत नाटकापासून झाली. सोकर बापूजी त्रिलोकेकर यानी १८७९ च्या जानेवारीमध्ये 'नलदमयंती' हे गद्यपद्यात्मक नाटक छापून प्रसिद्ध केले व त्याचे प्रयोग 'हिंदुसन्मार्गबोधक मंडळी' करू लागली. 'नलदमयंती' या नाटकातील पदे आर्या, साक्या, दिंड्या व निरनिराळ्या वृत्तातील श्लोक अशा प्रकारची होती. कुलकर्ण्यांनी या नाटकातील दोन पदांचे तोंडावळे दिले आहेत ते असे : 'पतिविण मजला सौख्य गमेना। काय करू मजला काही सुचेना' आणि 'मजला मातृगृही जाया, दयाळा सांगू नका.'

त्रिलोकेकरांनी १८९० मध्ये 'संगीत हरिश्चंद्र' हे नाटक लिहिले. त्यात 'राजा हरिश्चंद्र वाराणशीत जाऊन आपणास स्त्रीपुत्रासह विकत घ्या म्हणून जनांची प्रार्थना करतो.' ते पद असे :

*सुजनहो दया करा, विनवी जोडुनि करा ॥धृ॥*
*दोन भार मज सुवर्ण देऊनी घ्यावे मज किंकरा ॥सु॥*
*एक भार मज हेम देऊनी घ्या माझी प्रियकरा ॥सु॥*
*अर्ध भार मज हेम देउनी घ्यावे ह्या लेकरा ॥सु॥* (९१)

'रा. आण्णा किर्लोस्कर हे उत्तम गवयी होते असे नाही; तथापि ते गाण्याचे मर्मज्ञ आणि रसिक असून काव्यकल्पनेमध्ये निपुण आणि साधी व सुलभ पद्य रचना करण्यात कुशल असल्यामुळे त्यांनी संगीत नाटकाच्या प्रयोगास एक प्रकारचे मोहक स्वरूप आणून दिले... रेव्हेन्यू कमिशनरच्या ऑफिसात नोकरी धरल्यावर पुणे, मुंबई येथे संस्कृत व पारशी नाटकांचे प्रयोगही त्यांनी








कित्येक पाहिले; व या प्रयोगांवरून मराठी रंगभूमीलाही संगीताने सजवावे असे त्यांच्या मनाने घेतले.'(९१-९२)

यांनी पहिल्या प्रथम महाकवी कालिदासकृत संस्कृत शाकुंतल नाटकाचे गद्यपद्यात्मकभाषांतर करून या वेळपर्यंत लोकास माहीत नसलेला रागबद्ध संगीत नाटकाचा प्रयोग पुण्यातील रंगभूमीवर करून दाखविला. अगोदर शाकुंतल नाटकात पौराणिक कथाभाग गोवलेला, त्यात कालिदासासारख्या महाकवीने आपल्या बुद्धिवैभवाच्या मुशीतून नाटक ओतवून काढलेले, त्यात किर्लोस्करासारख्या रसज्ञ व मार्मिक गृहस्थाने त्यावर आपली मखलाशी केलेली आणि त्यात रा. नाटेकरासारख्या गोड आवाजाच्या व गायनकलेत कसलेल्या पात्रांची जोड मिळालेली; मग या प्रयोगाचा बहार काय सांगावा!(९३)

'रा. मुजुमदार हे शकुंतलेचे काम करीत असत... दुसरे इसम रा.नाटेकर हे उत्तम गवयी असून रागदारीत खोचदार पद्ये म्हणण्याची यांना हातोटी साधली असल्यामुळे आपल्या बारीक व गोड आवाजाने कण्व, मातली वगैरेंची कामे फारच बहारीची करीत. रा. वाघुलीकर यांचा आवाज दणकट असून लावणीच्या चालीवरची पद्ये म्हणण्यात पक्के मुरले असल्यामुळे, व मुरके घेऊन आपले गाणे उत्कृष्टरीतीने खुलविण्याची यांच्या अंगी शक्ती असल्यामुळे दुष्यंताचे काम आरंभापासून अखेरपर्यंत फारच उत्तम करीत.'(९४)

'शांकुतला'च्या अखरच्या तीन अंकास उत्तररात्र होत असून त्यातील 'स्वर्गी सर्वही पितर माझे ते' इ. गंभीर विचार ग्रथित केलेली पद्ये गंभीर स्वरात उत्तररागात म्हटलेली ऐकून ज्याचे चित्त रममाण झाले नाही असा एकही मनुष्य त्यावेळच्या प्रेक्षकात भेटणार नाही. असो; शाकुंतल नाटकात अण्णांनी संगीताकडे जसे लक्ष पुरविले होते तसेच अभिनयाकडेही पुरविले होते. त्यांची गायक पात्रे मूळची जशी गाणारी होती तशी ती अभिनय जाणणारी नव्हती. त्यातून कित्येकास तर लिहिण्या-वाचण्याचा संस्कारही बेताबाताचाच झालेला होता. तथापि, त्यांना पढवून सवरून तयार केल्यामुळे भाषणात व अभिनयात कोठेही व्यंग दिसत नव्हते.(९६-९७)

शाकुंतल नाटकाचा प्रयोग लोकांस आवडला आणि किफायतही होऊ लागली तेव्हा नोकरी सोडून नाटकाचा धंदाच करावयाचे अण्णासाहेब किर्लोस्करांनी ठरविले. नाटक कंपनीची स्थापना करून 'सौभद्र' हे संगीत नाटक लिहिले. सुभद्रेच्या कामासाठी, मोरोबा वाघुलीकर यांना बडोद्यास पाठवून, तेथील हरिदास कोल्हटकरबुवा यांचा धाकटा मुलगा भाऊराव यास पुण्यास आणवले. भाऊरावांबद्दल त्यांच्या वडिलास अण्णांनी ५०० रू. दिले.

भाऊराव हे दिसण्यास सुंदर होते. शिवाय त्यांचा आवाजही गोड होता. पुढे नाटेकर प्रभृती मंडळीच्या सहवासाने ते नाटकात असे काही मजेदार काम करू लागले की, थोडक्याच दिवसात लोकांच्या तोंडी 'भावड्या' हाच विषय काही दिवस होऊन बसला. भाऊरावांचा आवाज पाहाडी असून गोड होता. शिवाय नखरेबाज गाण्याचे ढंग त्यांच्या अंगी पूर्णपणे असल्यामुळे रंगभूमीवर येऊन आपल्या पद्यास सुरूवात केली की, उत्तम नागसराच्या आवाजाने नाग जसा डोलू लागतो तद्वत् भाऊरावांच्या गाण्याने प्रेक्षकसमूह भारून जाऊन तोही आनंदाने डुलू लागे. नाटकगृहात कितीही दंगा अगर कलकलाट असो, भाऊराव रंगभूमीवर आले की, जिकडे तिकडे शुक होऊन मंडळीचे लक्ष प्रयोगाकडे लागे.

सौभद्र नाटक व भाऊरावांचे गाणे यांच्यामुळे मराठी रंगभूमीचा उत्कर्ष व लोकप्रियता कळसाला पोचली. 'गुलहौसी लोक नाचबैठकीत गुंग झाले असता सुभद्रेचे एखादे तरी पद्य म्हटल्याशिवाय रंगाजीस विडा मिळत नसे!' सनईवाले, सारंगीवाले व पेटीवाले तर या नाटकाच्या पद्यांचा व्यासंग करू लागले. एवढेच नव्हे तर कथा, कीर्तन अथवा मेजवानी यांचा प्रसंग आला असता 'झाली ज्याची उपवर दुहिता' अगर 'रूचती का तीर्थयात्रा' अशासारख्या पद्यांशिवाय तो साजरा होत नसे. अण्णांच्या सौभद्र नाटकाने लोकास इतके काही वेडावून सोडले होते की, गोरगरीब व वार लावून जेवणारे








विद्यार्थी कपडे, पुस्तके विकून रात्रीच्या तिकिटांच्या पैशाची भरती करीत. विधवा स्त्रिया मारवाड्याकडून पैसे गहाणावर उसने आणीत; हे सांगितलेच आहे.

आजच्या पेक्षाहि त्या काळी; दुसऱ्याचा उत्कर्ष ज्यांना सहन होत नाही असे लोक संख्येने पुष्कळ असत. अण्णा नाटकाच्या धंद्यावर लोकांना बुडवितात, असा आरोप हे लोक करू लागले. 'कित्येकांनी तर त्यावरही ताण करून किर्लोस्कर मंडळी म्हणजे प्रति वासुदेव बळवंताचीच कंपनी असे म्हणून तीस दूषणे देण्यासही कमी केले नाही.' (यावरून आज आपण आद्य क्रांतिकारक असा ज्यांचा गौरव करतो त्या वासुदेव बळवंत फडक्यांविषयी लोकात काय बोलवा होती, तेही कळते.)(१०१) या लोकवार्तेची दखल 'केसरी' ने घेऊन किर्लोस्कर नाटक कंपनीची जोरदार तरफदारी केली होती.

त्रिलोकेकर किंवा किर्लोस्कर यांची नाटके पौराणिक कथानकांवर आधारलेली असल्याने ती पौराणिक संगीत नाटकेच होती; पण त्यांची बांधणी व प्रयोग भाव्यांपासून चालत आलेल्या पौराणिक नाटकांपेक्षा फार निराळ्या पद्धतीचे होते. या नव्या नाटकात गजानन, सरस्वती, विदूषक या पात्रांना स्थान नव्हते. मंगलाचरण आपल्या दोन साथीदारांसह सूत्रधार करी व नंतर नटी-सूत्रधार यांच्या संवादाने नाटकास सुरूवात होई. पात्रांच्या वेषात व रंगरंगोटीतही त्यांनी भडकपणा कमी अधिक वास्तववादी बदल केला. नल, दुष्यंत, अर्जुन वगैरे पात्रांस संस्थानिकांना शोभतील असे श्रीमंती पोषाख दिले. कृष्णाचे दोन हात मोडीत काढून दोनच हात ठेविले. राक्षसाचा आक्राळ-विक्राळपणा व थयथयाट संपविला व त्यास सर्कशीतील विदूषकाचा वेष चढविला. जुनी पौराणिक नाटके वेडीबागडी व सरधोपट असून नाटककंपनीचा थाटही दरिद्री किंवा फार तर बेतासबात असे. पण किर्लोस्कर कंपनीच्या नाटकास उत्तम प्राप्ती होत असल्याने तेथे कोणत्या गोष्टीची वाण नसे. किर्लोस्करांचे नाटक सर्व बाजूंनी 'रॉयल' होते.(१०९)

- ६ -

किर्लोस्कर मंडळीच्या आगे-मागे स्वतंत्रपणे किंवा किर्लोस्करांकडून स्फूर्ती घेऊन बऱ्याच नाटकमंडळ्या झाल्या. वासुदेव नारायण डोंगरे यांची नाट्यमंडळी १८८२ पासून नाटके करीत असे. ही नाटके संस्कृत नाटकांचीच भाषांतरे असून पदे रागदारीवर बसवलेली असत. पुढे डोंगऱ्यांनी उर्दू नाटकाच्या धर्तीवर इंद्रसभा नावाचा खेळ बसविला. त्यात नृत्ययुक्त गायन होते. डोंगऱ्यांकडे गजाननबुवा नावाचे नामांकित गवई होते व भाऊराव कोल्हटकरांपेक्षा त्यांचे काम सरस होई. 'एकदा वेडनबर्ग साहेब (कॉंग्रेसच्या जनकांपैकी एक) अहमदनगर येथे असता मेजवानीच्या प्रसंगी करमणुकीकरता रा. डोंगरे यांच्या कंपनीस मुद्दाम बोलावून नेऊन त्यांचे प्रयोग करविले, व त्यांबद्दल त्यांस चांगले इनामही दिले.'(१२०)

डोंगरे यांच्या नाटक मंडळी खेरीज 'किर्लोस्करानुयायी', 'पडळकर', 'नाट्यानंद', 'वाईकर' अशा अनेक संगीत नाटकमंडळ्या झाल्या. 'द्यूतविनोद', 'मृच्छकटिक', 'शारदा' वगैरे नाना नाटके रंगभूमीवर आली. या वेळी वेगळ्या अर्थाने 'गाजलेली' नाटकमंडळी माधवराव पाटणकरांची 'पाटणकर संगीत मंडळी' होय. यांचे 'विक्रम-शशिकला' हे नाटक प्रसिद्ध होते; व 'विक्रम 'श'शिकला, बाकीची अक्षरे शिकला नाही,' अशी कोटी लोक करीत. पाटणकरांच्या नाटकांवर कुलकर्ण्यांनी झणझणीत ताशेरा मारला आहे. 'रा. पाटणकर यांनी... कसला तरी नीरस कथाभाग घेऊन व पुढे तर मनःकल्पित गोष्टी घेऊन त्यावर नाटक रचावे, असा प्रकार चालविल्यामुळे नाटकातील भारदस्तपणा नाहीसा होऊन त्याची गोडी कमी झाली... रा. पाटणकर यांची कवित्वशक्तीही कमी दर्जाची असल्यामुळे व उष्टे विचार आणि उष्ट्या कल्पना जागजागी घुसडून दिल्यामुळे तिकडूनही नाटकास कमीपणा आला... संगीत नाटकात चांगली गाणारी पात्रे लागतात. ती नसल्यामुळे अध्ययनावाचून जे गाणे म्हणता येईल तशा प्रकारचे गाणे झाले व खरी गायनकला ओहटीस लागून

गाण्याचे चोचले व निवळ ढंग कायम राहिले. यात आणखी ग्राम्यतेची भर पडल्यामुळे पाटणकरी नाटके म्हणजे निवळ तमाशे होऊन बसले; आणि खरोखर तमाशामध्ये जसे झगडे असतात तसे झगडे यां या नाटकात असल्यामुळे या नाटकास तमाशा तरी का म्हणू नये?'(१३१)

तथापि, पाटणकरांची नाटके उच्चभ्रू लोकात प्रिय नसली तरी मजूर, कुणबी, माळी इत्यादि अशिक्षित वर्गास ती आवडती झाली. त्यावर पैसाही चांगला मिळू लागला. 'विक्रम शशिकला' नाटकात 'हां मदंगा लावू नका कर' अशा शब्दांनी सुरू झालेला 'झगडा' होता तो विशेष लोकप्रिय होता. 'पृथ्वीनाथा गर्वोक्तीचे करिते तुकडे हं हं म्हणता' असे एक गद्यप्राय पदही ह्या नाटकात होते.

बूकिश नाटकात ज्याप्रमाणे ऐतिहासिक, चरित्रात्मक व सद्यःस्थिति निदर्शक नाटकांचा प्रवेश झाला त्याच प्रमाणे संगीत नाटकांनीही पौराणिक व संस्कृतवरून घेतलेल्या कथानकांचा हात सोडून वरील तीन प्रकारची कथानके नाट्यरूपाने मांडायला सुरूवात केली. 'संगीत संभाजी', 'संगीत महाराणा प्रताप' व बाजीराव आणि मस्तानी यांच्या हकिकतीवर बसवलेले 'संगीत प्रेमबंधन' ही नाटके रंगभूमीवर आली. माणिकप्रभुप्रासादिक कंपनीने अनंत वामन बरवे यांचे 'लोकमतविजय' नावाचे नाटक केले होते. 'हे नाटक मुंबई इलाख्यात १८९७ साली जे राजकीय वादळ उठले होते व ज्यात कुकल्पतेचे साम्राज्य होऊन "चित्तक्षोभ, पक्षपात, कारस्थान, मतलब, दंड अशा एकतंत्री मंडळीची बंडाळी माजून" त्याचे प्रायश्चित्त विचारस्वातंत्र्य, मुद्रणकला, लोकमत वगैरेस कसे भोगावे लागले' हे दाखवले होते. या नाटकातील पात्रांची नावे 'असंतोष', 'उन्माद', 'शांती', 'राजनिष्ठा', 'देशाभिमान' इ. ठेवली होती. त्यातील एक पद आपाजी विष्णू कुलकर्णी यांनी दिले आहे ते असे : 'आधी क्रिया मम विचार करू तियेचा। शिक्षा अगोदर तपास पुढे गुन्ह्याचा।। पूर्वीच अंमल बजावुनि त्यास पाहू। आधार नंतर असा अधिकार वाहू।।'(१५८)

१९०३ साली 'माणिक प्रभु प्रासादिक मंडळी'ने 'रूढिविनाशन' नावाचे संगीत नाटक बसविले. यात बालविवाह, जरठोद्वाह (म्हणजे म्हाताऱ्याचे बालिकेशी लग्न), विधवाविवाह, केशवपन इ. अनेक विषय मांडले होते. खेरीज तरूण मंडळीच्या अकाली मृत्यूची कारणे, नणंदा-भावजयातील वैर, चहाच्या व्यसनाचे परिणाम अशा गोष्टीही दाखविल्या होत्या.

किर्लोस्करांच्या रंगमंचावर आता श्रीपाद कृष्ण कोल्हटकर बी.ए.एल्.एल्.बी. यांची नाटके येत होती. 'वीरतनय', 'मूकनायक', 'गुप्तमंजूष' ही चमत्कृती, विनोद, आलंकारिक भाषा इत्यादि गुणांनी सजविलेली पण एकाहून एक नीरस नाटके कोल्हटकरांनी लिहिली. दुर्बोध पदे, पात्रांचा सामाजिक दर्जा लक्षात न घेता सर्वांच्या तोंडी घातलेली एकाच प्रकारची भाषा, साधारण लोकास न कळण्यासारखे विचार अशा दोषांमुळे नाटकाचे प्रयोग रंगत नसत. त्या काळी (१९०७ पासून पुढे) 'रंगभूमी' नावाचे मासिक किर्लोस्कर मंडळीच चालवित असे. त्या मासिकातदेखील कोल्हटकरांच्या नाटकांवर सडकून टीका करणारे लेख येत होते.

- ७ -

पुस्तकाच्या तिसऱ्या भागात नाटकांचे जे प्रयोग होत असत त्यात दिसणाऱ्या दोषांबद्दल कुलकर्ण्यांनी अनेक सूचना केल्या आहेत. कुलकर्ण्यांचे मुख्य लक्ष्य नाटकाच्या धंद्यातील लोकांचा अशिक्षितपणा हे आहे. 'पुष्कळ कंपन्यात अशिक्षित लोकच फार असल्यामुळे, त्यातून कित्येकांना धड लिहिता वाचताही येत नसल्यामुळे नाटकाचे मर्म त्यांना मुळीच कळत नाही. अर्थात् त्या त्या रसास अनुकूल अशा प्रकारचा अभिनय किंवा भाषण त्यांच्या हातून होत नाही... सांगण्याचे कारण इतकेच की, नाटकाचा धंदा हा सुशिक्षित लोकांचा धंदा आहे, सबब त्यात सुशिक्षितांचा समावेश होईल तरच मराठी रंगभूमीचे पाऊल सुधारणेच्या कामात दिवसेंदिवस पुढे पडत जाईल हे नाटक कंपन्यांनी लक्षात ठेवावे.'(१८९)

स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीच कराव्यात असा








आग्रह १९३० सालानंतर जोराने धरला जाऊ लागला. खरे तर अगदी सुरूवातीपासून स्त्रिया नाटकात, तुरळक का होईना, कामे करीत असत. केवळ स्त्रियांच्या नाटकमंडळ्या, उदा. पुणेकर हिंदुस्त्री नाटकमंडळी, देखील होत्या. आपाजी विष्णू कुलकर्णी यांचे मत मात्र स्त्रियांनी नाटकात भूमिका करू नयेत, असे स्पष्ट आहे. आपल्याकडील समाजात स्त्री-पुरूषांचे संघट्टण अजिबात नाही. 'त्यामुळे स्त्रियांचा सहवास जात्याच मनुष्याच्या वृत्तीत फरक उत्पन्न करतो', असे ते सांगतात. 'आम्हास एका स्त्रीमिश्र नाटक मंडळीची एकाने अशी गोष्ट सांगितलेली आठवते की, एका स्त्रीने राधेचे सोंग घेतले होते व पुरूषाने कृष्णाचे सोंग घेतले होते. प्रवेश शृंगारपर असून त्याची आत सर्व तयारी झाली. आता पडदा उघडणार इतक्यात दोघाही स्त्रीपुरूषांच्या मनात कामविकार उत्पन्न होऊन त्यांच्या अशा प्रकारच्या चेष्टा सुरू झाल्या की, पडदा उघडणारास तो उघडण्याची पंचाईत झाली'(२१०)

संगीत नाटकांचा रोख लोकांच्या मनावर नीतीचा किंवा उच्च मनोवृत्तींचा ठसा न उमटवता शृंगाराचा ठसा उमटविण्याकडे असतो, असे कुलकर्ण्यांचे निरीक्षण आहे. 'हल्लीच्या बहुतेक नाटकात उत्तान श्रृंगार जास्त असून प्रयोगाचे वेळीही पात्रांकडून अशा प्रकारचा अभिनय होत असतो की, तो पाहून प्रेक्षकांचे मन शृंगारातच दंग होऊन जाते... स्त्रीपात्रे अलिकडे अशी काही नटू लागली आहेत की त्यात सभ्यपणास कोठेही थारा नसून त्यांचा उलट केसांचा बुचडा, बारिक कुंकवाची टिकली, चुण्या पाडलेले घोलदार व पट्टी काढून नेसलेले लुगडे, चंचल दृष्टीने पाहणे, व सतरा ठिकाणी मुरकणे ही केवळ वारांगणेस शोभण्यासारखी असून त्यांची भाषणे व हावभाव करण्याची तऱ्हा तशाच प्रकारची असते.'(२१३) काही नाटक मंडळ्यांनी आपल्या नाटकात गणिकांचे जलसे करून लोकांना आकर्षित करण्याची व जलशाच्या वेळच्या दौलतजादातून जास्त पैसे मिळविण्याची टूमही करून बघितली.

नाटकाचा धंदा म्हटला की, नाटकमंडळ्यांबरोबर नाटककार, संगीतकार, नाट्यगृहे, प्रेक्षकांसाठी उपहारगृहे, पडदे व त्यावरील चित्रे, ती काढणारे चित्रकार, जाहिराती अशा अनेक गोष्टी येतात. या सर्व विषयांसंबंधी आप्पाजी विष्णू कुलकर्णी यांनी आपली मते व्यक्त केली आहेत. 'जाहिराती नेहमी निरनिराळ्या आकाराच्या, निरनिराळ्या रंगाच्या व वरील अक्षरांची निरनिराळ्या खुबीने मांडणी करून लिहिलेल्या असाव्यात... हस्तपत्रके तर बहुतकरून ठरीव साचातली झाली आहेत... हस्तपत्रक हातात पडताच ते वाचण्याची जिज्ञासा लोकांना झाली पाहिजे.'(२२०) 'शाहू-नगर-वासींच्या एका हस्तपत्रकातील मजकूर कुलकर्ण्यांनी दिला आहे.' "अरे ह्या नाटकात पर्जन्य काळाला शोभेलं असाच मधुर शृंगार असून स्फुरण चढविणारा वीर रस, विरहानलाची हृदयात कालवाकालव करणारा शोक आणि दु:खाला पळविणारा हास्य- इतके रस असून शिवाय ज्यांच्या दर्शनाने मनावर उत्कृष्ट परिणाम होऊन पतिपत्नींना आनंदात गर्क होता येईल असे हे नाटक आहे."

"ठीक आहे. पाहू या तुझं बोलणं कितपत खरं आहे ते. रात्री स्वस्थ झोप घेऊन रविवारी दिवसा होणारं मंजुघोषा नाटक बघायला जाऊ या."(२२२)

-८-

आप्पाजी विष्णू कुलकर्णी यांनी रंगभूमीचा बहुतेक अंगांनी आढावा घेतला आहे व १८४३ पासून १९०३ सालापर्यंतचा रंगभूमीचा इतिहासही लिहिला आहे. रंगभूमी हा त्या काळातील मराठी मध्यमवर्गाच्या दृष्टीने प्रमुख उद्योग होऊन बसला होता. त्याबरोबरच या वर्गाच्या मनोरंजनाचे ते एकमेव साधन होते. त्यामुळेच वृत्तपत्रें व समाजधुरीण या उद्योगाला उचलून धरीत. नवीन नाटकांवर अग्रलेख लिहित, जाहिराती (पैसे अनेकदा बुडत असले तरी) छापत, कंपन्यांच्या मुक्कामांच्या बातम्या देत, कंपन्यातील फाटाफुटीच्या प्रसंगी मध्यस्थी करीत, कंपन्या दूरवरच्या शहरांना चालल्या तर त्यांना शिफारसपत्रे देत. बडोद्याचे








संभाजीराव महाराज, इंदूरचे तुकोजीराय इ. संस्थानिक नाटकमंडळ्यांना आश्रय देत इतकेच नव्हे तर स्वत:ची नाटकमंडळी देखील काढीत. सारांश, मराठी मध्यमवर्गीय व उच्चभ्रू समाज आणि नाट्यव्यवसाय यांच्यात एक समरसता निर्माण झाली होती.

अप्पाजी 'विष्णू हे टिळकांचे निष्ठावंत अनुयायी होते. टिळकांचे निकटवर्ती जे कृ.प्र.खाडिलकर व न.चिं.केळकर ते नाटककार तर होतेच पण अनेक नाटकमंडळ्यांचे हितचिंतक व मार्गदर्शक होते. टिळकांचे दुसरे एक अनुयायी व टिळकांचे पहिले चरित्रकार कृष्णाजी आबाजी गुरूजी हे देखील नाटकात रमलेले गृहस्थ होते, हे त्यांनी पुढे 'रंगभूमी' मासिकात जे लेख लिहिले त्यावरून दिसून येते. टिळकांचे मित्र व राष्ट्रीय पक्षाचे प्रमुख नेते दादासाहेब खापर्डे हे स्वत:नाटकांच्या तालमी घेत, हे प्रसिद्धच आहे. म्हणजे १८९७ पासून पुढे महाराष्ट्रात ज्या राष्ट्रीय पक्षाची चढती कमान होती त्या पक्षाचे नाटक मंडळ्यांशी घनिष्ट संबंध होते. खाडिलकरांची राजकीय घडामोडींचे सूचन करून राष्ट्रीय पक्षाच्या राजकारणाचा प्रचार करणारी 'कीचकवध', 'स्वयंवर', 'भाऊबंदकी' ही नाटके काहीसा धोका पत्करूनही धंदेवाईक नाटकमंडळ्यांनी लोकांपुढे हिरीरीने आणली त्याचे कारण राष्ट्रीय पक्षाबद्दल नाटक-धंद्याला वाटणारी आपुलकी हे देखील होते.

महाराष्ट्रात इंग्रजांचे राज्य आले, स्थिरावले आणि इंग्रजांचे शिक्षण फैलावले तेव्हापासून महाराष्ट्रातील सरंजामी संस्कृती ऱ्हास पावत चालली व मध्यमवर्गीय बूर्ज्वा संस्कृतीचा पगडा समाजावर बसत चालला. बूर्ज्वा संस्कृतीला अनुकूल अशी आर्थिक स्थिती परकीय राजवटीत इथे निर्माण होण्याची शक्यता फारच कमी होती. अशा वेळी नाटकाचा धंदा हे एक पैसे मिळविण्याचे कमी भांडवलाचे साधन होऊन बसले होते. बेकार तरूणांना रोजगाराचा तो एक मार्ग होता. धंदा म्हटला की त्यात बरेवाईट, स्तुत्य व निंदास्पद असे सर्व आलेच.

पण चांगले-वाईट, आल्हाददायक व विषादोत्पादक, किफायत व नुकसानी अशा जोड्यांच्या पलिकडे जोऊ न रंगतदार जीवनशैली या दृष्टीने नाटकधंदा व त्याने निर्माण केलेला माहोल याकडे पाहिले तर महाराष्ट्र या नाटकात रमला होता, हे जाणवत राहाते. हे जे रमणे आहे ते आप्पाजी विष्णू कुलकर्णी यांच्या 'मराठी रंगभूमी'मध्ये उतरले आहे व त्यांचे यश आहे.

- तळटीपा -

१. 'भरत-नाट्य-समाज व संमेलने' हे पुस्तक 'रंगभूमि' या मासिकात प्रसिद्ध झालेली व्याख्याने एकत्र करून तयार केले आहे. त्यात प्रा. भानू यांनी १९१० साली केलेले भाषण छापले आहे. पुस्तकावर प्रकाशक, संपादक, किंमत यापैकी कशाचाही उल्लेख नाही.

२. कंसातील आकडे 'मराठी रंगभूमि' या पुस्तकातील पानांचे शुद्धलेखन नवीन नियमांना धरून बदलून घेतलेले आहे.













अनुक्रमणिका

# आदिवासी लोकसाहित्याचे स्वरूप

*डॉ. भा. व्यं. गिरधारी*

आदिवासी लोकसाहित्य खऱ्या अर्थाने लोकसाहित्याचे स्वरूप उलगडवून दाखविण्याची क्षमता असलेले आहे. ते 'आदिम' म्हणजे अतिप्राचीन तर आहेच, त्याचे कूळ आणि मूळ शोधणेही अवघड आहे. ते मौखिक स्वरूपातच आजही आढळते. लिखित लोकसाहित्यात आदिवासी साहित्याचा फारसा समावेश झालेला दिसत नाही. शासनाच्या लोकसाहित्य संकलन समितीने हे काम जाणीपूर्वक हाती घेणे गरजेचे आहे.

## लोकमानस अविष्कार

आदिवासी लोकसाहित्यात लोकमानस उत्कटतेने आणि प्रभावीपणे आविष्कृत झालेले आहे. लोक समूहाची ती सांघिक निर्मिती आहे. समूहाचे मन त्यातून अभिव्यक्त होते. समुदायाच्या भावना त्यातून साकार होतात. आदिवासी लोकसाहित्यात लोकसंस्कृती जतन करून ठेवलेली आहे. हा अनमोल ठेवा एवढ्यासाठीच जपला पाहिजे. आता तो लिखित स्वरूपात प्रकाशित होण्याची तीव्र गरज आहे. आदिवासी जीवनमान आणि राहणीमानाची त्यातून सुयोग्य कल्पना येऊ शकेल. आदिवासी समाजाचे जगणे, सकाळपासून संध्याकाळपर्यंतची दिनचर्या त्यातून स्पष्ट होईल. तसेच त्यांचे सण, वार, जन्म, विवाह आणि मर्तिकाचे संस्कार, व्यवहार कळतील. त्यांची श्रद्धास्थाने, देव देवता, उपचार तंत्र, विश्वास, समज अपसमज कळतील. तत्कालीन रूढी, लोककलेचेही ज्ञान त्यांतून होईल.

## आदिवासी लोकसाहित्यातील लोकतत्त्व

आज लोकतत्त्व (Folk elements) विचाराला साहित्यात विशेष महत्त्व आले आहे. त्यातूनच लोकतत्त्वीय समीक्षा आधार घेत आहे. लोकसाहित्यात हे लोकतत्त्व अनुस्यूत आहे आणि समर्थ, कसदार साहित्यात या लोकतत्त्वाचा प्रत्यय येतो. आदिवासी साहित्यात विशेष रूपात या लोकतत्त्वांची जाणीव होते. लोकसाहित्यातील लोकतत्त्वांच्या अभ्यासाला आता गती येत आहे. प्राचीन मराठी वाङ्मयातील लोकतत्त्व हा अभ्यास ग्रंथरूपात डॉ. सौ. अमिता मुजुमदार यांनी १९८८ मध्येच मांडलेला आहे. आदिवासींचे लोकसाहित्य लोकनिर्मित असून ते लोकांसाठीच आहे. लोकांचे, लोकांसाठी आदिवासी लोकांकडून निर्माण झालेले हे लोकसाहित्य आहे. लोकतत्त्वाने ते भारलेले, झापटलेले साहित्य आहे. त्यातून आदिवासींच्या स्व लोकाभिमुखतेचा अनुभव येतो. आदिवासी समाज, धर्मजीवन आणि साहित्याचे आकलन होण्यासाठी या आदिवासींच्या लोकसाहित्याची फार मोठी मदत निश्चित होऊ शकेल. आदिवासींच्या सांस्कृतिक इतिहासाला त्यांच्या लोक साहित्याच्या अभ्यासाने अधिक उजाळा मिळेल लोकभ्रम, लोकविधी, लोकश्रद्धा आणि लोकविद्या, आदिवासी लोक दैवतांचा बोध होईल. समूह मनाच्या या आविष्काराला असलेल्या परंपरेची ओढ स्पष्ट होईल. यासाठी आदिवासी लोकसाहित्यातील लोकतत्त्व आकलनाला आणि लोकमाध्यमाच्या अभ्यासाला महत्त्व आहे.

## आदिवासींचे मौखिक साहित्य

आदिवासी लोकसाहित्य लोकसाहित्याचे वैशिष्ट्य म्हणून मौखिक परंपरेनेच आपल्यापर्यंत येऊन पोहचले आहे. त्याला जनसाहित्य म्हणता येईल. त्यात लोककथा, लोकगीते, जानपदगीते, देवा माणसांच्या जन्म मरणाच्या कथा, म्हणी, वाक्प्रचार, कोडी, उखाणे, सर्व प्रकारच्या लोकविद्या यांचा समावेश होतो. या साहित्याचे शब्दसौंदर्य, भावसौंदर्य, अर्थसौंदर्य अभ्यासण्याजोगे आहे.









अनुक्रमणिका

आदिवासींची निसर्गावरील भक्ती, बोली भाषेचे लोभस आणि लाघवी स्वरूप, नाते संबंधाच्या वर्णनातील जिव्हाळा, लोकसमज साहित्याला अस्सल देशीवळणाने नेणारे आहे. निसर्गाशीच तो मुक्तसंवाद साधीत असे. त्यामुळे आदिवासी लोकसाहित्यात विविधता आढळते. आदिवासींच्या परंपरेने चालत आलेल्या काही समजुती आणि आडाखे लक्षात घेण्याजोगे आहेत. 'मुंग्या आपली अंडी वर घेऊन चालल्या की समजावे यंदा भरपूर पाऊस पडेल. कारण त्या मुंग्या आपली अंडी सुरक्षित जागी हलवितात.' कावळ्याने घरटा शेंड्यावर बांधला की समजावे यंदा पाऊस पाणी कमी पडणार. झाडाच्या मध्यावर खोडाशी बांधला तर पाऊस वारा, वावधान जास्ती होईल. जमीनीत कीडेकीटक झाले, पिंपळ हिरवाई झाला, गुलमोहोर आगीसारखा फुलला, पळसाला केशरी रंगाची फुले आली तर मग पावसाळा सुरू होणार. वारूळाच्या वरच्या कंगोऱ्यावरून उत्तर दक्षिण दिशा होकायंत्रासारखी ते ओळखतात. या आदिवासींच्या समजूती अभ्यासनीय ठराव्यात.

## आदिवासी लोकसाहित्यातील 'देशी'पणा

आदिवासी लोकसाहित्यातील पाळेमुळे खणून काढली, शोधली तर त्यात अस्सल देशीवादाची प्रचिती अभ्यासकाला येऊ शकेल. प्रतिक्रिया म्हणूनच देशीपणा साहित्यात अवतरत असतो. परकी संस्कृती संघर्ष त्याला कारणीभूत असतो आणि अशा संघर्षाला आदिवासी लोकसमूहाने निश्चितच सामना केला असेल. त्या परकीय संस्कृतीच्या आक्रमणाला प्रत्युत्तर म्हणून आपल्या देवदेवता, आचार विचार संस्काराच्या कल्पना, श्रद्धा, अंधश्रद्धा, आपल्याला अवगत असलेल्या पारंपारिक विद्या एतद्देशीय म्हणून भारतीय संस्कृतीशी असलेले नाते, जोडली गेलेली नाळ स्पष्टपणे या आदिवासी लोकसाहित्यात अवश्य जपली असली पाहिजे. याची उदाहरणे अनेक देता येतील. आदिवासींच्या लोकसाहित्यात ती प्रतिबिंबित झालेली आहे. 'देशी'पणाची आवाहकताही या साहित्यात आढळते. या लोकसाहित्याच्या आकलनासाठी समाजशास्त्रीय दृष्टिकोण आणि समीक्षा पद्धती विशेष उपयुक्त ठरू शकेल. मग या साहित्यातून देशी सत्त्वाचा प्रत्यय घेता येईल. देशीवादाच्या स्वीकाराने हे आकलन अधिक चांगले होईल असे वाटते.

अडाणी गरीब दरिद्री असला तरीही कोणताही माणूस एकाकी, आयसोलेटेड, संस्कृती विरहित जीवन जगू शकत नाही. यास्तव धर्मविधी, देवदेवता, ग्रामदेवता निर्माण करून त्यांना आपल्या श्रद्धा आणि निष्ठा वाहाव्या लागतात. आदिवासींनी आपले जीवन सुसह्य करण्यासाठी ग्रामदेवता मानलेल्या दिसतात. ग्रामदैवत अख्ख्या गावाचं होतं. पाड्यावरही त्याची यात्रा भरते, उत्सव होतो. या ग्रामदैवताचा त्याने स्वतःला धाक घालून घेतलेला आहे. दुष्काळ, बर्बादी टळून पीकपाणी यावे म्हणून तो ग्रामदेवताला भजत असतो. त्याआधारे हितसंबंधही जपले जातात. भाबड्या मनाला विराम मिळतो. ग्रामदेवतांच्या उत्सवात कोठेही भेदभाव नसतो. भस्मदेव, मरीमाता, वराई माता, वाघदेव, शिवल्या देव, नागदेव, खंडोबा, आसरा, भैरोबा, दुल्हादेव, बदादेव या ग्रामदेवतांची आदिवासी पूजा बांधतात.

## समृद्ध लोकसंस्कृती आणि प्रतिमा विश्व

आदिवासी लोकसाहित्यातून निर्मात्याच्या समृद्ध प्रतिमा विश्वाचा प्रत्यय येतो. त्याचप्रमाणे समृद्ध लोकसंस्कृतीचीही जाणीव होते. मौखिक परंपरेने चालत आलेल्या आदिवासींच्या लोकसाहित्यातून लोककथा, लोकगीते, म्हणी, वाक्प्रचारातून, लोकविधि आणि लोकश्रद्धांमधून आदिवासींची आगळी जीवनशैली आणि संस्कृती आपण समजून घेऊ शकतो. त्यांच्या संस्कृतीची पाळेमुळे मौखिक साहित्यातील प्रतिमाविश्वात दडलेली आहेत. एक व्यापक वैश्विक मानवतावादी अशी ही संस्कृती आहे. या संस्कृतीत आतिथ्यशीलता, समरसता, माणुसकीचा गहिंवर आणि एकात्मता जाणवते. याला लोकसाहित्याचा पुरावा आणि वारसा आहे. आदिवासींचा डोंगऱ्या देव म्हणजे डोंगरातला महादेवच आहे किंवा त्यांच्या विवाह संस्कारातील विवाहापूर्वी गायिले जाणारे








'ढवळगाण' व 'ढवळी' स्त्री म्हणजे धवलगिरी पर्वतावरील शंकर पार्वतीच्या लागलेल्या लग्नाच्यावेळचे ते गाणे आहे.

भिल्लांच्या बोलीभाषेतील बारशाच्या लोकगीतात स्त्रीयांनी देवाधर्माचे स्तवन केले आहे. हे एक धार्मिक गीत आहे. "वरखडीला जीवानी गाडी सजने शंकरदेवजी पार्वती नटती लक्ष्म्या आईने पूजा भोपनी शंकर देवनी पूजा थोपवी."

डॉ. रमेश कुबल यांनी आदिवासी नाटक या लेखात नमूद केल्याप्रमाणे 'आदिवासींच्या धर्माचरणात भक्ती बरोबरच सर्जन आणि आस्वाद या क्रिया एकाचवेळी घडत असल्यामुळे आदिवासींचे धर्माचरण विधी, कलाप्रकार कलाविष्कार म्हणून ओळखले जातात.' यांत यात्वात्मकता, प्रतिकात्मकता, प्राकृतिकता, मंत्रशरणता आणि आविष्कारातील हर्षनिर्भरता हे आदिवासी धारीचे पंचप्राण म्हणून त्यांनी उल्लेखिलेले आहेत. त्यात आदिवासींची धार्मिकता, सामाजिकता सामावलेली आहे. त्यांचे हे धार्मिक पूजाविधी नृत्य, गायन वादन, नाट्य, नाद लय संगीताने भारलेले असतात. बोहाडा, कांबडनाच, ढोलनाच, तारपानृत्य, थाळगानात कणसरी पूजन, काज असे नाट्यात्मक विधी आणि विधीनाट्ये आदिवासी संस्कृतीत आहेत. या साऱ्यांचे दर्शन त्यांच्या लोकसाहित्यातून घडते. ही लोकसाहित्याची जुनी आणि समृद्ध परंपरा आहे. त्यांचे नाच गाणे म्हणजे जगणेच असते. त्यांचे जगणे हीच कला आहे; आणि त्यांच्या लोककला हेच जीवन आहे.

## आदिवासींच्या लोककथा

लोकसाहित्यात ग्रामीण लोकमानस साक्षात झालेले असते. जात्यावरच्या ओव्या, खेळगीते, सण, उत्सव गीते, विविध नाच, जागरण, दंडार, भारूड, गोंधळ इत्यादी प्रसंगानुकूल गीते या लोकसाहित्यात वास्तव प्रतिबिंबित झालेले असते. लोककलांचा-लोकवाद्ये, लोकनृत्ये, लोकश्रद्धा- यांचा समावेश लोकसाहित्याची महत्त्वाची अंगे म्हणून करता येतो. मांरोळ नाच, काज, भाळगान, बोहाडा, लगीनगीत, गौरीगीत, भोंडल्याचा नि टिपऱ्यांचा नाच, मर्तिक नाच, तोरण व सवण, डोंगरच्या मावल्या, डाका, तारपा, हस्तकला, चित्रकला, ढोलनाच यांची गणना लोककलात होते.

गाईच्या शेणानं सारवलेल्या कुडाच्या लिंपलेल्या भिंती असलेल्या झोपड्यांवर तांदळाच्या पीठाने रेखाटलेली ही चित्रकला वारली पेंटींग्ज म्हणून प्रसिद्ध आहे. त्यात रेखांचे समार्थ्य, प्रत्ययाला येते. बांबूच्या, घायपातच्या धाग्यातून विणलेल्या टोपल्या, चटया, टोप्या, पिशव्या आदिवासींच्या हस्तकलेचे नमुने आहेत. त्यातही सूक्ष्मता आणि कमालीचे सौंदर्य आहे. त्यांची कोडी, कुटे, नृत्यकला आणि त्यातील कसरतीचे खेळ अनुभवण्यासारखे आहेत.

## आदिवासींची लोकनृत्ये आणि वाद्ये

आदिवासींच्या जीवनामध्ये एकूणच लोकसाहित्याला आणि त्यातल्या त्यात लोकगीतांना फार महत्त्व आहे. ही लोकगीते जीवनातील बहुतेक सर्व महत्त्वाच्या घटनाप्रसंगांना आणि संस्कारांना उद्देशून रचलेली आहेत. आदिवासी निसर्गपूजक असल्यामुळे आणि कृषी हेच त्यांचे जगणे असल्यामुळे ते पावसाला 'परमेसर' मानतात. धान्य पिकवणाऱ्या जमिनीला 'धरतरी' शेतीकामात उपयोगी पडणाऱ्या गायत्रीला 'गावतरी' तर कणसाला 'कणसरी' अशा देवताच मानतात. चंद्र, सूर्य, वीज, ढग हे सारेच त्यांना पूजनीय देव आहेत. कणसरी या अन्नधान्य देणाऱ्या देवतेच्या प्रार्थनेच्या वेळी मुख्यत: वारली लोक 'ढाक' हे लोकवाद्य वाजवतात. ढाक हा विशिष्ट प्रकारचा ढोलच आहे. मोठ्या डमरूच्या आकाराचा तो असतो. ठाणे आणि नाशिक जिल्ह्यात हे वाद्य विशेष करून पाहायला मिळते. कळंब झाडाचे पोकळ लाकडी खोड आणि बोकडाची कातडी यापासून हे वाद्य बनते. कातडीच्या दोन्ही कुडांना ७/७ छिद्रे असतात. त्यातून ही कातडी घट्ट ओढून विधीपूर्वक वाद्य तयार केले जाते. हे वाद्य सजवून समूहगानात वाजवले जाते.

या वाद्याच्या तालावर बेफाम होऊन भगत







नाचतो. कणसरी देवीच्या प्रार्थनेची ही परंपरा आहे.

घांगळी हे आदिवासी लोकनृत्यात वाजविले जाणारे पारंपारिक वाद्य आहे. सणवार, भूमाता आणि कणसरी देवता या उत्सवात विशेषत: वारली समाज साजश्रृंगार लेवून नृत्य करतात. भूमातेकडून मिळालेलं वाद्य घांगळी आहे अशी आदिवासींची श्रद्धा आहे. घांगळी वाजवताना गाण्यासोबत कथाही लावली जाते. मोरपिसे, काचेच्या रंगीत बांगड्या, आरसा किंवा बोटांच्या साहाय्याने घांगळी हे तंतुवाद्य वाजवले जाते.

भांगसरथळा हे वाद्य 'सरपट' नावाच्या झाडाच्या काठीच्या टोकाला एक विशेष प्रकारचे मेण लावून ती काशाच्या थाळीच्या पृष्ठभागावर चिकटवून बनवितात. वरपासून खालपर्यंत काठीवर अंगठा आणि तर्जनीने कंपन निर्माण करून त्याच्या लयीवर आदिवासी कथा सांगतो. याला थाळगान म्हणतात. वारली आणि कोकणा समाजात ठाणे, नाशिक जिल्ह्यात थाळगान सर्रास रूढ आहे.

आदिवासी स्त्रीपुरूष सुगीच्या दिवसात मोठ्या उत्साहाने ढोलनाच करतात. आदिवासींमध्ये विविध प्रकारचे आणि आकाराचे ढोल ढोलक्या प्रचारात आहेत. माडिया लोकांचे ढोल तीन-साडेतीन मीटर लांबीचे असतात आणि दोन ते तीन फूट व्यासाचे असतात. त्याच्या मध्यभागी चिक्कणमाती लावलेली असते. हा ढोल वाजवताना गव्याचे शिंग असलेले शिरस्त्राण डोक्यावर धारण करतात. बांबूंच्या कामट्यांवर हे शिरस्त्राण बसवून त्याला मागच्या बाजूने मोरपिसे, कोंबडीची पिसे आणि पुढच्या बाजूला गव्याची शिंगे मढवलेली असतात. पारंपारिक नृत्यानंतर त्याचे भाग सुटे करून बांबूंच्या पेटीत ठेवले जातात. माडीयांच्या या प्रथेप्रमाणेच आदिवासी कसरतींसह ढोलनाच करतात आणि त्याच्या तालात गीतगायन होते.

महाराष्ट्रातील मल्हार कोळी, ढोर कोळी, ठाकूर, कातकरी या आदिवासींच्या पारंपारिक नृत्याला ढोलाची साथ लागतेच. गोकुळाष्टमी, वाघबारस, शिमगा या सणाला या नृत्याला बहर येतो. शंकर, पार्वती, विष्णू, भूमाता, चंद्र, सूर्य यांना वंदन करून नृत्याची अखेर होते.

महाराष्ट्रातील प्रसिद्ध लोकवाद्य म्हणजे आदिवासींचे 'तारपा' हे होय. तारपा हे वाद्य सुक्या दुधी भोपळ्यापासून तयार केलेले असते. त्याला बांबू जोडून तारपा हे वाद्य बनविले जाते. भोपळ्याची लांबी मोठी असते. ताडाच्या पानापासून मेण लावून बासरीसारख्या नळ्या आणि कर्णा बसवलेला असतो. नारनदेवाने तारपावाद्य दिले असा समज वारली मानतात. सुगीच्या दिवसात निघालेल्या पिकाचा आनंद लुटण्यासाठी आदिवासी स्त्री पुरूष रिंगणात फेर धरून तारपाच्या तालावर मनसोक्त रात्र जागवितात. आदिवासींच्या तारपानृत्यात पावलं टाकण्याच्या पद्धतीला महत्त्व आहे.

आदिवासींनाही आपले देवधर्म आहेत. लोकदैवते आहेत. वेताळ झोटींग, भाऊल्या, वाघोबा, हिरवा देव, म्हसोबा, कान्होबा, कणसरी, दुंदुर्भा, सारजा, नृसिंह, बहिरोबा, अहिरावण, गावदेवी या ग्रामदेवतांना त्यांनी आपल्या देव्हाऱ्यात स्थान दिलेले आहे. आदिवासींना निसर्गाच्या सहवासाने सौंदर्यदृष्टी उपजतच लाभलेली आहे. त्यांच्या सौंदर्यविषयक जाणिवा निसर्गसापेक्ष आहेत. 'देवराईची' कल्पना निसर्गपूजक आदिवासींनीच जपलेली आहे. आदिवासींच्या बोहाड्यातही देव देवतांना मिरवताना विविध प्रकारची नृत्ये तल्लीन होऊन करतात.

## आदिवासींच्या लोकसाहित्यातून प्रतीत होणारा उदात्त दृष्टिकोण

आदिवासींमध्ये मातृसत्ताक पद्धतीचा प्रभाव अद्यापही टिकून आहे. म्हणूनच आदिवासींच्या विवाहात मुलीच्या पित्याला देहज (धान्य, दोन पोती भात, चांदी रूप्याचे दागिने) देण्याची प्रथा रूढ आहे. त्यासाठी मुलाला ही सगळी जुळवाजुळव आर्थिक तरतूद करून करावी लागते. काहीवेळा हे शक्य नसल्यास घरोंदा (घरजावई) म्हणून काही वर्ष तो मुलीकडे राहून शेतीकाम करतो. काहीवेळा तर विवाह न करता एकत्र राहून संसार करून अनुकूल परिस्थिती झाल्यावर विवाहसोहळा साजरा








करतात. वेळप्रसंगी पती पत्नीत बेबनाव असल्यास इच्छेनुसार काडीमोड दिला जातो आणि भावबंध निर्माण झाल्यास पूर्वीच्या गरोदर असलेल्या स्त्रीचाही स्वीकार होतो. यामध्ये आदिवासींचे कमालीचे औदार्य, स्त्रीदाक्षिण्य आणि उदात्त दृष्टिकोण लक्षात येतो.

अवर्षण म्हणजे सुका किंवा अतिवृष्टी म्हणजे ओला असा दुष्काळ पडल्यास आदिवासी कुटंब परिस्थिती जाणून परस्परांना आधार देतात. काही वेळा उचलून पैसे देणे शक्य नसल्यास कष्टाच्या मोबदल्यात रक्कम उभी करून सार्वजनिक कामात देतात. दूध हे वासरांसाठी असते म्हणून त्यांच्यासाठी राखून ठेवून कोरा चहा पिण्याची पद्धती रूढ आहे. झोपडी बांधताना सुद्धा आधी जनावरांची व्यवस्था करतात. गोठा बांधतात व मग राहिलेली जागा माणसासाठी बांधतात. म्हणजे माणसाइतके पशूचे ते थंडी, वारा,ऊन,पाऊस यापासून रक्षण करतात. आदिवासींची ही दानत लक्षवेधी आहे निसर्गाच्या जवळिकीतून हा त्यांचा उदार दृष्टीकोण परिपुष्ट झालेला दिसतो. वनौषधीचा उपचार ते विनामोबदला करतात.

## आदिवासींची मौखिक संपदा

आदिवासींचे लोकसाहित्य मौखिक परंपरेनेच चालत आलेले आहे. हे लोकसाहित्य लोकजीवनातूनच अवतरले आहे. लोकसाहित्याने लोकसंस्कृतीतील इष्टाचा पुरस्कार आणि अनिष्टांचा परिहार केलेला आहे. लोकभाषेतील लोकमनाचा हा अविष्कार आहे.

आदिवासी लोकगीतांतून सुंदर भावचित्रे रेखाटलेली आहेत. लग्नसोहळा प्रत्येक विधीप्रसंगात भावपूर्ण गीते आढळतात. वरमाईची गाणी, झालझेंड्याची गाणी, तेलवणाचे गीत लक्षणीय आहेत. कुटुंबातील नाती लोकगीतांतून उत्कटपणे दिवाळी, दसरा, होळी या सणांच्या निमित्ताने अभिव्यक्त होतात. उखाणे, म्हणी, कोडी, वाक्प्रचार असे विपुल अक्षरधन बोलीभाषेत गोवलेले लोकसाहित्यात आढळते. यातु विद्या, चित्रकला, लोककथा, नक्षीकाम अशा लोकविद्यांचा समावेश लोकसाहित्यात होतो. बोहाडा, काज, कवळी भाजी, मांदोळनाच, भोंडल्या, टिपऱ्यानाच, मर्तिक नाच, हस्तकला यांचाही समावेश आदिवासी लोककला विचारात होतो.

आदिवासी लोकसाहित्यात म्हणी महत्त्वाच्या आहेत. 'फडकं घे, मडकं घे, सूट' या म्हणीत उपजिविकेसाठी केवळ एक मडके आणि फडके माणसाला पुरे होते. मर्यादित गरजांत जगण्याचा आदर्श या म्हणीतून सूचित होतो. आणखी काही म्हणी पुढीलप्रमाणे निर्देशिता येतील.

'कणगीत दाणा तं भील उताणा'
'निलाजऱ्याला मारला पिढा तं म्हणे बसाया दिला'
'लाज मरे तो भुके मरे' इ.

आता उखाणे पहा -

'जात कावल्याची रगत माणसाचा' - करवंद
'एक दोरी टाकली तर बारा बैल बांधात' - काकडी
'दिवसभर गुरांच्या मागं हिंड रातचे खोपाला राहं' - काठी

आदिवासींची लोकगीतं बोलकी आहेत. माहेरवाशीण सासरी जाते तेव्हां ती व्याकुळ होते. तिला आपले घर आणि नातीगोती आठवतात. त्यावेळी केलेला उपदेश -

'सासरच्या घरी गं बाई मी, बाबा कुणाला म्हणू।
म्हण गं म्हण गं लेकी, तुझ्याचं गं सासऱ्याला।।
सासरच्या घरी गं बाई मी, आई कुणाला म्हणू।
म्हण गं म्हण गं लेकी, तुझ्याच गं सासूला।।'

हीच नाती पुराणातही गुंफली आहेत.

'सीता गेली वारूळे तळेला सोनु कंबळायला।
हाक मारिते दशरथाला ग तिच्या सासऱ्याला।
हाक मारिते कौसल्याला ग तिच्या सासूला।
हाक मारिते लक्ष्मुमणाला ग तिच्या दिराला।
हाक मारिते रामयाला ग तिच्या नवऱ्याला।।'

आदिवासींच्या लोकसाहित्यातील ही पारंपारिक लोकगीते विस्मृतीत जाऊ नये म्हणून ती छापील







स्वरूपात उपलब्ध करून दिली पाहिजेत. या गीतात रामायणातील सीतामाई वारूळ नावाच्या पाड्यावरील एका तळ्यात कमळे आणायला गेली ही कल्पना असून सीता, सासरा दशरथ, सासू कौशल्या, दीर लक्ष्मण आणि पती राम यांना हाक देते. सोनू हे गापारीच्या मैत्रिणीचे नाव आहे. आदिवासी लोकगीतात अशी आपल्या आप्तांची आणि परिचितांची नावे गोवतां येतात आणि पुनरावृत्तीने गीताची लांबण ही लावता येते.

उदा. कुंतीचे गाणे पहा -

'सांगते देवाला रे कुंती सांगते कृष्णाला।
रे कर्ण पांडव रे पहिला, रे कर्ण हा पांडव पाहिला रे।
फुल तोडण्यासाठी गेले जल देवीला
सूर्य मंत्राची आठवण मजला
सूर्य मंत्र जपीला रे देवा सूर्यमंत्र जपीला
रे कर्ण हा पांडव रे पहिला ॥'

असे हे 'रामायण-महाभारतही' आदिवासी लोकसाहित्यात मुरलेले आहे. अशी शेकडो लोकगीते उद्धृत करता येतील.

या गीतात पुढे -

'नव महिने भर्ग जपिला
सूर्य मंत्रानी कर्ण हा आला
काळा कर्ण अवतरला
रे देवा काळा कर्ण अवतरला'

यात कुंती आपले दु:ख कृष्णाला सांगते कर्ण सूर्य मंत्राने नऊ महिने गर्भ जपून अवतरला पण प्रेमाविणा तो गंगेला अर्पण करावा लागला. सूर्याच्या प्रखर तेजापासून मात्र हा काळा कर्ण अवतरला ही अत्यंत सूचक कल्पना आहे.

### लोकसाहित्याचे भाषिक विशेष

'काज' म्हणजे कामकाज यातले कार्य या अर्थाने आहे. 'काज' हा सामुदायिक श्राद्धविधी आदिवासी विधुर आणि विधवा यांच्या कौटुंबिक पुनर्वसनासाठी विधी आहे. मृतात्म्यांना संतुष्ट करण्याबरोबरच कृषि-संस्कृतीची गरज म्हणून ते कौटुंबिक पुनर्संघटन होत असावे.

पर्यावरण शास्त्राच्या दृष्टिनेही आदिवासींची लोकभाषा लक्ष वेधून घेणारी आहे.

उदाहरणार्थ -

'जेठ अन पाण्याची भेट'
'मादवा अन हांडी मडकी वाजवा'
'पुस करी हुस'
'चैत म्हणजे दैत'
'पडल उतरा त हाल खाइना कुतरा'
'पडतील स्वाती तर पिकतील मोती'
'पडल्या मघा नाही तर वरती बघा'
'पडल हाती तर करील अन्नाची माती'
'झाड तठवरा..बरसती पाण्याच्या धारा'
'तेण....खाई धन'
'जळो...पण पिको' (जमीन जाळण्याच्या प्रथेवरून)राब
'पोट हाय संग त काय पडल मागं'
'होळी जळाली अन थंडी पळाली'
'काम ये ना मये अन घमेले घेऊन पये'
'सुकेतळ्याला पाखरे फडफडती' (उत्तर:लाह्या)
'आरवत कोंबडा तरंगत जाय..चारशिंग दहा पाय'
(उत्तर:नांगर, दोन बैल, नांगरधारी)
'काळी गाय काटे खाय..पाण्याला पाहून उभी राहाय'
(उत्तर:चप्पल)
'माही बीजा...कोंबजाशिजा'

'पोषापाषांनो...उगाच निगा' यात शृंगार सूचनेची झलक आहे. घरौंदा म्हणजे घरजावई, मेढिगा-लग्न लावणारी स्त्री, गरोदर स्त्री म्हणजे 'दोनजीवी', गोडा दिवस म्हणजे सोमवार, मोडा दिवस म्हणजे मंगळवार, 'उगवती' म्हणजे पूर्व आणि मावळती म्हणजे पश्चिम दिशा अशी ही त्यांची सरळ, सोपी वस्तुस्थिती निदर्शक लोकभाषा आहे. लोकवास्तवाचा परिपोष करणारी आहे.

अशा आदिवासी लोकसाहित्याचे संवर्धन व्हावे, जतन व्हावे ही आजची आपली सांस्कृतिक गरज आहे. केवळ तोंडी, मौखिक स्वरूपात आजही








अस्तित्त्वात असलेल्या या लोकसाहित्याचा आपल्या देशी समृद्ध परंपरेचे आपल्याला सुयोग्य भान येण्यासाठी, संशोधन, संकलन आणि विवेचक, चिकित्सक अभ्यास करून तो ग्रंथरूपात प्रसिद्ध करणे आवश्यक आहे.

**- महत्त्वाचे संदर्भ -**

आदिवासी नाटक (लेख) डॉ.रमेश कुबल, मराठी मित्र, शिवळे, मार्च २००४.

प्राचीन मराठी वाङ्मयातील लोकतत्त्व : डॉ.सौ.अमिता मुजुमदार, सविता प्रकाशन, औरंगाबाद, १९८८.

आरसा : आदिवासी जीवन शैलीचा, डॉ.भा.व्यं.गिरधारी, युगांतर प्रकाशन, द्वितीय आवृत्ती, २००४.

महाराष्ट्र दर्शन दिनदर्शिका : महाराष्ट्रातील लोकवाद्ये, सविता शेलार, २००५.



## : लेखक परिचय :

★ **प्रा. श्री. मा. भावे** - प्राध्यापक, आय.आय.टी. पवई, मुंबई; गणित व तत्त्वज्ञान या विषयाचे ज्येष्ठ अभ्यासक. या विषयांशी संबंधीत २५ शोधनिबंध प्रसिद्ध. शिक्षक चळवळीत सहभाग.
पत्ता :- ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे.४११००४

★ **डॉ. भा. व्यं. गिरिधारी** - आदिवासी लोकसाहित्यावर निबंध. निवृत्त प्राचार्य.
पत्ता : 'विभा', पर्णश्री सोसायटी, एचपीटी/आरवायके कॉलेजजवळ, नाशिक. ४२२ ००५

★ **प्रा. मो. गो. धडफळे** - फर्गसन महाविद्यालयात ३८ वर्षे पाली व संस्कृतचे अध्यापन, तसेच १० वर्षे उपप्राचार्य. पुणे विद्यापीठ व टिळक महाराष्ट्र विद्यापीठ यांमध्ये संशोधन-मार्गदर्शक. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराचे मानद कार्यवाह. 'पाली भाषेतील बौद्ध संतसाहित्य' या पुस्तकाचे कर्ते.
पत्ता : फ्लॅट नं. २, यशोदीप-ब, रामबाग कॉलनी, सदाशिव पेठ, पुणे. ४११ ०३०



अनुक्रमणिका










## थेल्सने घेतलेली झेप

*मूळ लेखक - लेविस वोल्पर्ट*

*परिचायक - श्री. मा. भावे*

तंत्रज्ञान आणि धर्म या दोन विचारधारा जगातील अनेक भागात व निरनिराळ्या काळी उत्पन्न झाल्या. परंतु, विज्ञानाचा जन्म इतिहासात एकदाच व एकाच ठिकाणी झाला. ग्रीसमध्ये इ.स.पू. ६०० वर्षे या काळी विज्ञान जन्माला आले. तंत्रज्ञान व धर्म यांच्यापेक्षा निराळी अशी विज्ञानाची स्थिती असण्याचे कारण हेच की, वैज्ञानिक विचार हा अस्वाभाविक विचार आहे. आम्ही वर जे म्हटले आहे की, विज्ञान प्राचीन ग्रीसमध्ये उदयास आले, त्यावर बहुतेक पंडितांचे एक मत आहे. मात्र विज्ञान व तंत्रज्ञान यांच्यात भेद नाही, असे जे विद्वान मानतात त्यांना हे म्हणणे मान्य नाही. विज्ञानाच्या स्वभावाचे आकलन होण्यासाठी विज्ञानाच्या उदयाच्या संबंधातील ही अनन्यसाधारण वस्तुस्थिती नीटपणे नोंदवून घेणे जरूरीचे आहे. विज्ञान हे मनुष्याच्या इतर व्यापारांपेक्षा वेगळ्या प्रकारच्या व्यापारातून उदयाला आले; फक्त एकाच संस्कृतीत व समाजात विज्ञानाने जन्म घेतला. विज्ञानाचा पुढे जो विकास झाला तेथून सुरूवात करून आपण मागे गेलो तर विज्ञानाची मुळे ग्रीक संस्कृतीला नेऊन भिडवता येतात. विज्ञान ग्रीक संस्कृतीतच उत्पन्न का झाले, याचा इथे विचार करण्याची गरज नाही. पण त्यापासून हे लक्षात घ्यावयाचे आहे की, मनुष्याच्या सांस्कृतिक इतिहासात विज्ञानाचा आढळ तुरळक ठिकाणी होतो आणि त्यावरून असे दिसते की, वैज्ञानिक संसाधन (इन्क्वायरी) याला काही वैशिष्ट्यपूर्ण पैलू आहेत.

इ.स.पू. ६०० च्या सुमारास ग्रीसमधील मिलेटोस नावाच्या गावात थेलूस नावाचा मनुष्य राहात होता. जग काय आहे, हे सांगण्याचा 'वैज्ञानिक' प्रयत्न त्याने प्रथम केला, तो अशा अर्थाने की, त्यासाठी त्याने दंतकथांचा किंवा पौराणिक कथनांचा आधार घेतला नाही. त्यामुळे त्याचे म्हणणे खरे की खोटे, हे पडताळून पाहण्याची शक्यता होती. जग कशाचे बरे असेल, या कुतूहलाला त्याने काहीसे अनपेक्षित उत्तर दिले की, जग हे जलतत्त्वाचे बनले आहे. पाणी हे घन, द्रव व वायू या तिन्ही रूपात आढळते. ढग आणि नद्या पाण्यामुळे बनतात. पाण्याखेरीज जीवन शक्य नाही. थेल्सने जो कयास केला, तो काही लोकांना मती गुंग करून टाकणारा वाटला असेल. पण साहजिक समजुतीच्या (कॉमनसेन्स) विरूद्ध जाणारे विचार हेच बहुधा विज्ञानातील महत्त्वाचे विचार असतात, हे आपण पाहिलेच आहे. थल्सने मांडलेल्या विचारातील कळीचा मुद्दा असा होता की, निसर्गाच्या मुळाशी एकच तत्त्व आहे, हे तो स्पष्ट करीत होता. जगात नाना प्रकारचे व आकार-रूपाचे पदार्थ आहेत. पण त्या साऱ्यांना सामाईक असे तत्त्व आहे, हा थेल्सच्या विचाराचा मुख्य धागा होता. निसर्गाविषयी वस्तुस्थितीनिदर्शक (ऑब्जेक्टिव्ह) व चिकित्सक विचार करण्याची पद्धत इथून सुरू झालेली दिसते. अनेक संस्कृतीत व ग्रीक संस्कृतीही यापूर्वी जगाच्या घडणीविषयी विचार मांडले गेले होते, पण ते दंतकथांच्या रूपात. जगाचा सर्वांगीण खुलासा करणारी व पडताळून पाहण्यास योग्य अशी कल्पना कोणी मांडली नव्हती. थेल्सच्या या विचारातून, जगाच्या इतिहासात प्रथमच, अशी खात्री व्यक्त होत होती की, निसर्गाचे नियमन करणारे काही कायदे आहेत व ते कायदे शोधून काढता येतात. विज्ञानाला पाश्चात्य जगात यशस्वी होता आले व अंधश्रद्धानी भरलेल्या कालखंडातही विज्ञान तगून राहिले याचे इंगित निसर्गाच्या नियमाची कल्पना आणि निसर्गाचे आकलन बुद्धीच्याद्वारे होते यावरील



अनुक्रमणिका

विश्वास यात आहे. 'जग जलतत्त्वाचे बनले आहे' ही मनुष्यांच्या इतिहासातील सर्वात महत्त्वाची आणि चेतनादायी कल्पना होती. विशेष म्हणजे, या कल्पनेचा सार्वजनिकरीत्या विचार होऊ शकत होता. आजपर्यंत निसर्गाचे आकलन करण्यासाठी दंतकथा व निसर्गातील घटनांचे मनुष्याला अनुकूल अगर प्रतिकूल असणे या दृष्टिकोनांचा अवलंब होत असे. थेल्सच्या प्रस्तावात आपल्याला पहिल्यांदा मनुष्याचा संदर्भ न घेता निसर्गाचा तटस्थपणे विचार करण्याची प्रवृत्ती दिसते. आजपर्यंत मनुष्याच्या जिज्ञासेचा निसर्ग हा स्वतंत्र आणि एकटा असा विषय झालेला नव्हता. जिज्ञासा किंवा कुतूहल असे, ते मनुष्य व निसर्ग यांच्यातील संबंधाबाबत. थेल्स पासून पुढे मात्र निसर्ग व मनुष्ययातील अविभाज्य नाते बाजूला ठेवून निसर्गाचा स्वतंत्रपणे विचार करण्याची सवय ग्रीकांनी घेतली.

मिलेटोस गावचा थेल्स हा जगातील पहिला शास्त्रज्ञ होता. तरी त्याच्याकडे काही तात्त्विक विचारांचा वारसा चालत आलेला होता, हे विसरता कामा नये.ईजिप्त व बॅबिलोनिया येथील समाजांनी गणिताचा वापर करण्यात जी प्रगती केली होती, त्याचीही चांगली माहिती त्याला असली पाहिजे. मिलेटोस हे ग्रीकांचे महत्त्वाचे बंदर होते आणि तेथे संपन्न बाजारपेठ होती. फिनीशिया, ईजिप्त व इतर अनेक देशांशी मिलेटोसहून व्यापार चाले.त्यामुळे मिलेटोसमध्ये नाना प्रकारचे विचारप्रवाह कायम येत असतील. शिवाय,ग्रीकांचे हे वैशिष्ट्य होते की,भविष्य काळातील ज्यू,ख्रिस्ती किंवा मुसलमान धर्मीयांप्रमाणे कोणत्याही विचारांच्या घट्ट चौकटीला ते बांधील नव्हते. नाना कल्पनांशी मुक्तपणे खेळ करावा, अशी ग्रीक संस्कृतीला सवय होती.

ईजिप्त व बॅबिलॉन येथील समाजांनी अंकगणित व भूमिती यांचा व्यावहारिक उपयोग केला होता. बॅबिलॉन येथील लोकांना इ.स.पू. १७०० इतक्या प्राचीन काळी पायथॅगोरसने (पुढे) शोधिलेल्या काटकोन त्रिकोणाविषयीच्या नियमाची माहिती होती व त्यानी त्या नियमात बसणाऱ्या संख्या त्रिकुटांची (उदा.३,४,५) यादीही केली होती. ईजिप्तच्या लोकांनी भूमापनाची उपकरणी तयार केली होती व भूमापनाच्या तंत्रात बरीच प्रगती केली होती. पण एक उपयोग तंत्रज्ञान या पायरीवरून गणिताला उचलून त्याला तर्काधारित शास्त्राच्या उंचीवर नेण्याचे काम ग्रीकांनी केले; व त्यात थेल्सचा वाटा महत्त्वाचा होता. भूमितीतील काही महत्त्वाची प्रमेये त्याने सिद्ध केली. उदा. व्यासामुळे वर्तुळाचे दोन सारखे भाग होतात; दोन सरळ रेषा परस्परांना छेदतात तेव्हा त्या बिंदूशी होणारे सम्मुख कोन समान असतात; किंवा, अर्धवर्तुळातील कोन काटकोन असतो. या प्रमेयात आपणास हे आढळते की, ही विधाने रेषा व वर्तुळे यांच्याविषयी केलेली सामान्य(जनरल) विधाने आहेत. ही विधाने सर्व रेषा व सर्व वर्तुळे यांच्याविषयी माहिती देतात आणि विज्ञानाची आकांक्षा याच प्रकारची, एका वर्गाविषयी साधारण माहिती मिळविण्याची असते. बॅबिलोनिया किंवा ईजिप्त येथील संस्कृतींनी अनुभवाला आलेल्या सारखे-पणाचा उपयोग करून काही आकडेमोडीचे नियम बसवले होते. ग्रीकांनी ते नियम एका प्रकृष्ट (अॅब्स्ट्रॅक्ट) विज्ञानात गोवून टाकले. काही व्यावहारिक प्रश्नांच्या सोडवणुकीत गुंतलेले गणित आता एक विज्ञान बनले.

अॅनॉक्झिमँडर हा थेल्सचा समकालीन होता व तोहि मिलेटॉस इथेच राहात असे. जग हे जलतत्त्वाचे बनले आहे, हा थेल्सचा सिद्धान्त अॅनॉक्झिमँडर याला पटला नाही. अॅनॉक्झिमँडरला वाटले की, जलतत्त्वापेक्षा वायुतत्त्व हेच जगाच्या मुळाशी असणे जास्त शक्य आहे. यातून जी वादावादी व चर्चा सुरू झाली त्यापासून आधुनिक विज्ञानाची उपज झाली. इतके असले तरी 'प्रयोग' हे विज्ञानाचे महत्त्वाचे तंत्र मनुष्याला अद्याप गवसले नव्हते.

घटनांचा खुलासा दंतकथांच्या सहाय्याने करायचा नाही तर खुलासा करण्यासाठी संगतवार आणि चिकित्सेचा विषय होऊ शकेल अशी विचार-मालिका मांडावयाची ही पद्धती थेल्स व त्यानंतरचे ग्रीक विचारवंत





अनुक्रमणिका

यांनी सुरू केली. हे एक फार मोठे संक्रमण मानले पाहिजे. दंतकथांपासून एखादी घटना कशी घडली व का घडली याचा खुलासा मिळतो; पण त्या खुलाशात दोन त्रुटी राहतात. एक, ज्या प्रश्नाचा उलगडा दंतकथा करू पाहते त्या प्रश्नाचे नेमके स्वरूप सांगण्याचा प्रयत्न दंतकथेकडून होत नाही; दोन, हा खुलासा करताना जी गृहीतके मानलेली असतात ती कोणत्या घटनांना लागू पडतात, याचे स्पष्टीकरण होत नाही. उदाहरणार्थ, बॅबिलोनियातील लोक असे मानत की, मार्डुक नावाच्या देवाने टियामात नावाच्या जलदेवतेला फाडली व तिच्या एका भागाचे आकाश व दुसऱ्या भागाची जमीन केली. परंतु, आकाश व जमीन कशी बनली हे सांगण्याची आवश्यकता बॅबिलोनीयातील लोकांना का वाटली याची माहिती या दंतकथेतून मिळत नाही. तसेच, ईजिप्तमधील लोक असे मानत की, 'रा' नावाचा देव आकाशातून होडी चालवत जातो व त्याच्या बरोबर सूर्य पूर्वेकडून पश्चिमेला जातो. सूर्याच्या गतीचा हा एक खुलासा आहे; पण हा खुलासा बरोबर आहे की चूक आहे, हे पडताळून पाहता येणारे नाही. पृथ्वीचा आकार, विश्वातील तिचे स्थान आणि पृथ्वीच्या गतीबद्दलचे ॲरिस्टॉटलने केलेले विवेचन भलेहि चुकीचे असेल; पण ते काही दंतकथांच्या वर्गात घालता येत नाही. जेव्हा सृष्टीबद्दल अशा तऱ्हेची विवेचने चर्चेला येऊ लागली तेव्हा नैसर्गिक घडामोडीचा आणि स्थितीचा योग्य खुलासा कोणता याची चिकित्सा सुरू झाली व तार्किक सुसंगती हिचे महत्त्व पटू लागले. पृथ्वी स्थिर आहे कारण वायू किंवा जल यांनी तिला उचलून धरले आहे, अशा प्रकारची विवेचने लोक आता स्वीकारीनासे झाले; कारण मग प्रश्न येई की, त्या वायूला किंवा जलाला कशाचा आधार आहे?

अशा रीतीने विज्ञानाचा उदय झाला आणि इथपासून आपणास इतिहासात शास्त्रज्ञ दिसू लागले. या शास्त्रज्ञांची नावनिशीवार दखल घेतली जाऊ लागली; त्यांचे धणधकट विचार व व्यक्तिमत्त्वे यांच्या नोंदी होऊ लागल्या. हा मोठा बदल होता. बॅबीलॉन व ईजिप्त येथील संस्कृतीत जे वैद्यक, गणित किंवा फलज्योतिष जोपासले गेले होते त्यातील संशोधकांचा पत्ता आपण कितीही शोध घेतला तरी लागत नाही. तेथील विचारवंत आपणास परंपरेपासून मुक्त करून परंपरेची चिकित्सा करीत आहेत व आपल्या अभिजात संशोधनाने परंपरेला नवी दिशा देत आहेत, असेही आपल्याला आढळत नाही. पण थेल्सनंतरच्या ग्रीसमध्ये ही गोष्ट होताना आपल्याला सर्रहा आढळते. अर्थात; ग्रीक संस्कृतीत विज्ञानाखेरीज जी विचारक्षेत्रे होती तेथेहि विचारवंतांना व्यक्तिशः श्रेय दिल्याचे आपणास आढळून येते. उदा. ग्रीक कवी स्वतःचा नावनिशीवार उल्लेख आपल्या काव्यातून करीत. त्याचप्रमाणे युक्तिवादाची चिकित्सा किंवा परीक्षण करण्याची पद्धती ग्रीक न्यायालयातील कार्यपद्धतीमुळे नागरिकांच्या अंगी बाणली असावी. त्यामुळे झाले असे की, कोणा एका व्यक्तीचा किंवा विचारप्रणालीचा दबदबा विरोधी विचारांना दडपून टाकीत आहे, असा देखावा ग्रीक इतिहासात दिसत नाही. उलट जगाच्या घडणीविषयी ज्या ज्या विचारवंतांनी विचार मांडले त्यांचे स्वागत व परीक्षण झाले. आपल्या समकालीन शास्त्रज्ञांनी आपल्या शोधांचा आदर करावा ही शास्त्रज्ञाच्या दृष्टीने सन्मानाची गोष्ट असते आणि जेव्हा शास्त्रज्ञ स्वतःच्या नावाने स्वतःचे शोध विचारवंतांसमोर मांडू लागले तेव्हाच अशा तऱ्हेचा सन्मान शक्य झाला.

ॲरिस्टॉटलने जे विज्ञान रचले ते आधुनिक अभ्यासकाला समजायला अवघड जाईल. एखादी घटना घडून येण्यासाठी चार प्रकारची कारणे लागतात, असे ॲरिस्टॉटल मानतो. पण आजचा शास्त्रज्ञ त्यातील दोन प्रकारची कारणेच स्वीकार्य असल्याचे मान्य करील. एका गोष्टीचा दुसऱ्या गोष्टीवर पडणारा प्रभाव, या अर्थाने कारण, हे एक; आणि 'अ' ही गोष्ट 'ब' ही गोष्ट घडवून आणते या अर्थाने 'अ' ही 'ब' चे कारण असणे, हा दुसरा प्रकार. तथापि, ॲरिस्टॉटलने जे विज्ञान मांडले त्यातून मिळणारी जगाची व्यवस्था ही जगाच्या घडणीविषयी जी सामान्य समजूत आहे, तिच्याशी पुष्कळ जुळते.








सृष्टीतील घटनांचा खुलासा देण्याविषयी ॲरिस्टॉटलने दोन पथ्ये सांगितली होती. जे आपणास माहीत आहे त्यापासून सुरूवात करून नव्याने अनुभवाला आलेल्या घटनेचा खुलासा करावा; आणि, विज्ञानातील निगमन (डिडक्शन) स्वतः काही प्रमाण तत्त्वे गृहीत धरून त्या तत्त्वांपासून सुरू करावे. ॲरिस्टॉटलला याची जाणीव नव्हती की, जगाची घडण सामान्य समजुतीला पटेल अशा रीतीने झालेली नाही. त्यामुळे त्याने सृष्टीच्या घडणीविषयी जे विचार मांडले त्यातील चुकांबद्दल त्याला दोष देण्यापेक्षा त्याची कीवच केलेली बरी. ॲरिस्टॉटलच्या सांगण्यानुसार जग हे पृथ्वी, आप, अग्नि व वायू या चार भूतांच्या मिसळणीतून बनले आहे व या भूतांपैकी प्रत्येकाच्या ठिकाणी ओलेपणा, कोरडेपणा, थंडी व उष्णता या चारापैकी दोन गुणधर्म आहेत. हा सर्व विचार रोजच्या अनुभवाला अनुरूप असाच आहे. वस्तूंच्या हालचालींविषयी आता अगदी सोपे स्पष्टीकरण देता येते, अग्नि साहजिकच वर जाण्याची इच्छा बाळगतो तर पृथ्वी या भूताचा प्रभाव असणारी वस्तू खाली पडते. पृथ्वी ही विश्वाच्या केन्द्रस्थानी आहे आणि आकाशस्थ वस्तू या पृथ्वीच्या भोवती असणाऱ्या गोलांना जडाविलेल्या आहेत. वर्तुळाकार फिरणे हा स्वाभाविक व सर्वोत्तम मार्ग आहे. त्यामुळे सूर्य व इतर नभोगोल पृथ्वीभोवती वर्तुळाकार फिरतात. हे ओघानेच आले. ॲरिस्टॉटलने जीवशास्त्रात जे शोध लावले त्यामुळे अभ्यासाची नवी क्षेत्रे माणसाला उपलब्ध झाली. मनुष्य व इतर प्राणी यांची शरीररचना, भ्रूणविज्ञान, जनावरांची वर्तनपद्धती या विषयात ॲरिस्टॉटलने महत्त्वाची निरीक्षणे मांडली. सृष्टीत होणाऱ्या क्रिया काही तरी हेतूने होत असतात असा ॲरिस्टॉटलचा सिद्धान्त होता. उदा. बदकांचे पाय बोटांमध्ये पडदे लावून वल्ह्यासारखे झालेले दिसतात. ते कशामुळे? तर बदकांना पोहता यावे म्हणून. सिद्धान्तांच्या पडताळणीसाठी प्रयोगाचा उपयोग करता येईल, याची ॲरिस्टॉटलला कल्पना नव्हती. परंतु आज ज्याला आपण चिन्तन-प्रयोग (थॉट एक्स्पेरीमेंट) म्हणतो त्यांचा त्याने काहीसा उपयोग केला होता. म्हणजे, तो असा प्रश्न मांडीत असे की, जर नभोगोलीय स्थिर राहिले असे मानले तर पृथ्वी कोणत्या दिशेने फिरते आहे, असे दिसून येईल?

या वैज्ञानिक विचारांचे फळ काय, या विषयीही ॲरिस्टॉटलचे विचार स्वच्छ होते. जिज्ञासेचे समाधान या पलीकडे असल्या उद्योगांचा काही उपयोग नाही, हे त्याने सांगितले आहे. 'आपल्या अज्ञानापासून सुटका होण्यासाठी माणूस तात्त्विक विचारांकडे वळतो. त्यामुळे कोणताही व्यावहारिक फायदा मिळावा अशी त्याची अपेक्षा नसते. ज्ञानसंपादन इतकीच त्याची आकांक्षा असते. इतिहासावरून हेच दिसते. जेव्हा जगण्यासाठीच्या गरजा भागल्या तेव्हा मनुष्य, विरंगुळा म्हणून, तात्त्विक (पक्षीःवैज्ञानिक) विचारांकडे वळला.'

ग्रीकांनी जे विज्ञान निर्माण केले त्यातील बहुतेक सर्व, पुढे, चुकीचे ठरले. गतीविषयक संकल्पना, गर्भाच्या वाढीबद्दलच्या कल्पना, पृथ्वी व अंतरिक्ष यांची परस्परसापेक्ष स्थाने याविषयीचे ग्रीकांचे विचार आता कोणीच मान्य करत नाही. परंतु, ग्रीकांचे विचार टाकाऊ ठरले यामुळे ग्रीकांना कमीपणा येतो असे नाही. विचार चुकीचे ठरणे ही विज्ञानाच्या क्षेत्रातील नित्याची गोष्ट आहे. तरीही ग्रीक समाजातील दोन धुरंधरांनी जे बौद्धिक पराक्रम केले ते थेल्सने घेतलेल्या झेपे इतकेच कौतुकास्पद आहेत. युक्लिडने रचलेली भूमिती व आर्किमिडीजने मांडलेले गतिशास्त्र हे ते पराक्रम होत. या दोन शास्त्रांमुळे विज्ञानाच्या भविष्यातील प्रगतीचा पाया रचला गेला आणि ही दोन शास्त्रे नसती तर प्रबोधनकालीन वैज्ञानिकांनी आपले शोध कसे लावले असते, हा गांभीर्याने विचार करावा असा प्रश्न आहे.

इ.स.पू. ३०० वर्षे हा युक्लिडचा काळ समजला जातो. भूमितीतील अनेक प्रमेये युक्लिडच्या काळाच्या आधीही माहीत होती, हे ध्यानात घेता, युक्लिडला भूमितीशास्त्राचा जनक म्हणणे बरोबर होणार नाही. परंतु, मूळतत्त्वांपासून ज्यातील प्रमेये निगमनाने सिद्ध होतात असे शास्त्र रचावे अशी आकांक्षा ॲरिस्टॉटलची होती; व ती आकांक्षा पूर्ण करण्याचे कार्य








युक्लिडने भूमितीशास्त्राच्या बाबतीत केले. युक्लिडची भूमिती तीन 'पॉस्च्युलेटस्' व बारा 'ॲक्शम्स' अशा पंधरा मूलतत्त्वांवर अवलंबून आहे. त्यातील एक मूलतत्त्व वगळता बाकींची तत्त्वे बिनतक्रार मान्य होण्याजोगी होती. उदा. 'सर्व काटकोन सारख्या मापाचे असतात' वादविषय झालेले मूलतत्त्व सोप्या भाषेत सांगायचे तर असे होते; 'एक सरळ रेषा 'र' व तिच्या बाहेरील बिंदू 'ब' असे दिले, तर 'ब' मधून 'र' ला समांतर अशी एक व एकच सरळ रेषा काढता येते.' या तत्त्वाविषयी वाद असा निर्माण झाला की, बाकीच्या मूलतत्त्वांचा उपयोग करून हे तत्त्व एक प्रमेय म्हणून सिद्ध करता येईल का? या वादामुळे गणिताच्या प्रगतीला, युक्लिडच्या नंतर दोन हजार वर्षांनी, निराळीच दिशा मिळाली.

आर्किमिडीजचे शिक्षण युक्लिडच्या विद्यार्थ्यांच्या शिकवणीसाठी झाले होते. आर्किमिडीज हा ईजिप्तमधील ॲलेक्झांड्रिया या शहरी राहात असे. आर्किमिडीजने स्थितिकी (स्टॅटिक्स) व द्रवस्थापत्य (हायड्रॉलिक्स) या शास्त्रांचा अभ्यास केला. स्थितिकीमध्ये अचल व संतुलित अशा बलांचा अभ्यास केला जातो तर द्रवस्थापत्यात द्रवपदार्थातील वस्तूंवर कार्य करीत असणाऱ्या बलांचा (फोर्सेस) अभ्यास करतात. त्याने कप्पी व कप्प्यांची साखळी यांचा शोध लावलाच पण एका काठीच्या भोवती मळसूत्राकार नळी गुंडाळून तिच्या सहाय्याने पाणी उचलून काढण्याचा प्रयोगही केला. तथापि जीवनातील गरजा भागविणाऱ्या गोष्टींचा शोध लावण्यात काही धन्यता आहे, असे आर्किमिडीजला वाटत नसे. ज्या सिद्धान्तांच्या रचनेत सौंदर्य व सूक्ष्म विचार यांचा आढळ होतो, असे सिद्धान्त रचण्यात कौशल्य आहे, असे तो मानत असे. शुद्ध शास्त्र व व्यावहारिक शास्त्र यांच्या मूल्यांविषयी आजही जो वाद आहे त्याचा पहिला पुरावा आपल्याला आर्किमिडीजच्या वर उल्लेखिलेल्या मतात दिसून येतो. आपल्या अभ्यासाचा विषय झालेले शास्त्र युक्लिड प्रमाणेच मूलतत्त्वे+निगमन यांच्या करड्या शिस्तीत बसवून मांडण्याची आर्किमिडीजची पद्धत होती. स्थितिकी शास्त्राची सुरूवात तो युक्लिडप्रमाणेच मूलतत्त्वे व व्याख्या यापासून करतो व निरनिराळ्या वस्तूंचे (बॉडीज) गुरुत्व-मध्य कसे काढायचे त्याच्या रीती देतो. तरफांचे नियमही त्याने या स्थितिकीवरील ग्रंथात दिले आहेत. द्रवस्थापत्यावरील पुस्तकातील पहिले मूलतत्त्व असे आहे : 'द्रवात बुडवलेली वस्तू वर येताना त्या वस्तूच्या गुरुत्वमध्यापासून द्रवाच्या पृष्ठभागावर टाकलेल्या लंबाच्या दिशेने वर येते.' या मूलतत्त्वाच्या आधारे तो असे सिद्ध करतो की, 'एखादी वस्तू पाण्यावर तरंगताना तिने बाजूला सारलेल्या पाण्याचे जे वजन असेल तितक्याने त्या वस्तूचे वजन कमी भरते.' अनुभवातील घटना गणिताच्या सहाय्याने मांडण्याची सुरूवात आर्किमिडीजपासून झालेली आढळते. आर्किमिडीजला गणिताचा या पद्धतीने उपयोग करण्याची स्फूर्ती व्हावी ही आश्चर्यजनक गोष्ट आहेच; पण गणितासारखी निष्कृष्ट (ॲब्स्ट्रॅक्ट) भाषा घटनांचे चपखल वर्णन करण्यास समर्थ ठरावी, ही अधिक आश्चर्याची बाब आहे.

ईजिप्त व बॉबिलोन येथील समाजांनी आकाशस्थ ग्रह-ताऱ्यांची काळजीपूर्वक व सातत्याने निरीक्षणे केली होती. ईजिप्तच्या लोकांचे उद्दिष्ट उत्तम पंचांग तयार करावे, हे होते; तर बॉबिलोनच्या मनुष्यांना आकाशातील घटनांचे आडाखे किंवा वेळापत्रक तयार करून हवे होते. या दोन्ही संस्कृतीत खगोल-शास्त्र नावाची चीज काही निर्माण होऊ शकली नाही; कारण, ज्यांच्या बाबतीत विचार-विनिमय होऊ शकतो अशा तऱ्हेचे अंतरिक्षातील घटनांचे खुलासे द्यावेत किंवा देता येतात, असे त्यांना वाटलेच नाही. मात्र अशी स्पष्टीकरणे देण्याचे काम, थेल्सच्या मिलेटॉस गावाचाच रहिवासी व समकालीन विचारवंत ॲनॉक्झिमेंडर याने केले. त्याने अंतरिक्षातील काही गोलांचा आकार मोजला आणि चंद्राची हालचाल व चंद्राला लागणारी ग्रहणे यांचा खुलासा करण्याकरिता फिरत्या चाकाचे प्रारूप (मॉडेल) बसविले. त्याच्यानंतर दोनशे वर्षे उलटल्यावर ग्रीकांनी विश्वाच्या रचनेविषयी द्वि-गोल प्रारूप बनविले. पृथ्वी








हा लहान गोल मोठ्या गोलाच्या मध्याशी लटकलेला आहे तर मोठ्या गोलाला आतून तारे जडवलेले असून तो गोल पृथ्वीभोवती फिरतो आहे, असे ते प्रारूप होते. हे प्रारूप काही वस्तुस्थितीला धरून नाही; परंतु त्यामुळे विश्वाविषयीच्या कल्पनांना नीटस रूप येते आणि अंतरिक्षातील ताऱ्यांची जी फुटकळ निरीक्षणे जमली होती त्यांना निगमनाच्या साखळीत गुंफण्यासाठी काही अवकाश सापडतो. आज देखील नौकानयनाचा अभ्यास करताना हे प्रारूप उपयोगी पडते.

परंतु ग्रीकांच्या काळातच या द्वि-गोल प्रारूपाला पर्याय म्हणून निराळी प्रारूपे पुढे आली होती. उदा.इ.स.पू. ३०० च्या सुमारास ॲरिस्टार्कस याने असे सुचविले होते की, सूर्य केंद्रस्थानी ठेवून पृथ्वी त्याच्या भोवती फिरते, असे प्रारूप मानावे. परंतु ही सूचना मनुष्याच्या सामान्य समजुतीला धक्का देणारी होती. ॲरिस्टॉटलने या प्रारूपाचा विचार करून त्याच्या विरोधात लोकांना पटतील असे युक्तिवादही मांडले होते. उदा. जर पृथ्वी सूर्यभोवती फिरते तर तिची गती आपणास जाणवत का नाही आणि पृथ्वीवरचे प्राणी व वस्तू पृथ्वीपासून विलग होऊन पडत का नाहीत? ॲरिस्टॉटलचे युक्तिवाद सामान्य समजुतीला पटण्यासारखे आहेत व आजही अनेक रानटी टोळ्यातील माणसे व आपली मुले देखील असाच विचार करतात.

परंतु ॲरिस्टॉटलने विश्वाचे जे प्रारूप मानले होते ते पायाभूत धरून जर ग्रहांच्या हालचालींचे गणित मांडले तर ते प्रत्यक्षाशी जुळेना. आज आपल्याला माहीत आहे की, ॲरिस्टॉटलच्या प्रारूपात तीन चुका होत्या. एक, पृथ्वी भोवती ग्रह व सूर्य फिरतात हे बरोबर नाही; पृथ्वी व इतर ग्रह सूर्यभोवती फिरतात. दोन, ग्रह वर्तुळाकार कक्षेत फिरत नाहीत तर लंबगोलाकार कक्षेत फिरतात. तीन, ग्रहांची गती एकच नसते तर ती कमी अधिक होते. या तीन चुकांमुळे ग्रहांची गणिताने येणारी स्थिती व प्रत्यक्षातील त्यांची स्थाने यांचा मेळ बसेना. त्यावर टॉलेमी (इ.स.पू.१५०) या खगोलशास्त्रज्ञाने 'अधिचक्र' (एपिसायकल) नावाचा तोडगा काढला. त्याचे स्वरूप साधारण असे होते. ग्रह 'ग' हा पृथ्वीभोवती वर्तुळाकार फिरतो खरा; पण त्याचा मार्ग त्यापेक्षा गुंतागुंतीचा असतो. 'प' ही पृथ्वी आहे व तिच्या भोवती 'व' या वर्तुळावर 'ग' हा ग्रह खरे पाहता फिरला पाहिजे - पश्चिमेकडून पूर्वेकडे. पण प्रत्यक्षात 'व' या वर्तुळावर आपला मध्य कायम ठेवून फिरणारे 'उ' हे वर्तुळ आहे व 'उ' या वर्तुळावर 'ग' हा ग्रह पूर्वेकडून पश्चिमेकडे फिरतो. या युक्तीमुळे ग्रहाची प्रत्यक्ष स्थिती व गणिताने येणारे स्थान यातील तफावत कमी झाली खरी; पण गणित बसवणे गुंतागुंतीचे होऊन बसले.




इथे असा प्रश्न सहजच उद्‌भवतो की, ग्रीकांनी विज्ञानाच्या क्षेत्रात इतकी उंच भरारी मारली होती, तर त्यांची प्रगती त्यानंतर मंदावली ती कशामुळे? ॲरिस्टॉटल नंतर जवळ-जवळ दोन हजार वर्षे, म्हणजे कोपर्निकस (१४७३-१५४३) उदयाला येईपर्यंत खगोलशास्त्र थबकून राहिल्यासारखे का झाले? इथे कोपर्निकसच्या शोधांविषयी काही गोष्टींची नोंद घेणे जरूरीचे आहे. पहिली गोष्ट अशी की, कोपर्निकसने टॉलेमीचे खगोलशास्त्र, पृथ्वीकेंद्रित ग्रहमालेच्या जागी सूर्यकेंद्रित ग्रहमालेची कल्पना मांडण्याचा अपवाद वगळता, जसेच्या तसे स्वीकारले होते. दुसरे असे की, हा बदल त्याला करावासा वाटला त्याचे कारण ग्रह-ताऱ्यांची काही निरीक्षणे त्याला उपलब्ध झाली होती अशा प्रकारचे नव्हते. त्याने ही कल्पना केवळ आंतरिक खात्रीच्या बळावर मांडली होती. तिसरा भाग असा की, कोपर्निकसने टॉलेमीवर जी टीका केली तिचा मतितार्थ टॉलेमीने अधिचक्राचा स्वीकार करताना ॲरिस्टॉटलचे वर्तुळाकार व स्थिरवेगी गतीचे तत्त्व सोडले, हाच होता. म्हणजे कोपर्निकसचा उद्देश ॲरिस्टॉटलची विश्वव्यवस्था उलथी-पालथी करावी असा मुळीच नव्हता. त्याने ग्रहांच्या गतींविषयी कोणताच महत्त्वाचा व नवीन विचार मांडला नाही. त्या बाबतीत त्याने ॲरिस्टॉटलचे सिद्धान्तच मान्य केले होते.








सूर्यकेंद्री ग्रहमाला मान्य करून ग्रहांच्या गतींविषयीची स्पष्टीकरणे, कोपर्निकस नंतर पन्नास वर्षांनी केप्लरने दिली. कोपर्निकसचा भर वर्तुळाकार कक्षेवर होता. कक्षा लंबगोलाकृती असतात असे केप्लरचे मूलभूत प्रतिपादन होते. कोपर्निकसचा सिद्धान्त काय किंवा केप्लरचे ग्रहांच्या गतींचे नियम काय, या गोष्टी ग्रहांविषयी काही नवी निरीक्षणे पुढे आली म्हणून आल्या नव्हत्या. विचारव्यूहातच नवे बदल होत होते. ॲरिस्टॉटलचा सर्व-व्यापी प्रभाव नवीन संशोधक क्रमाक्रमाने सोडून देत होते, व नेमकी हीच गोष्ट फार कठीण जात होती. ॲरिस्टॉटलच्या विचारांच्या विळख्यातून बाहेर पडणे किती अवघड होते, हे गॅलिलिओने खाली पडणाऱ्या वस्तूंच्या गतीचे जे विवेचन केले, त्यावरून कळून येईल.

ॲरिस्टॉटलचे म्हणजे असे होते की, प्रत्येक वस्तूत पृथ्वी, आप, वायू व अग्नि (तेज) यापैकी कोणते तरी तत्त्व प्रभावी असते. या तत्त्वांच्या जागा पृथ्वी व पृथ्वी आणि चंद्र यांच्या दरम्यानचा अवकाश यात निश्चित आलेल्या आहेत. वस्तूंचे जे नैसर्गिक संक्रमण वर जाते किंवा खाली येते या स्वरूपात होते, ते त्या वस्तूंवर कोणत्या तत्त्वाचा प्रभाव आहे, यावरून ठरते. उदा. वाफ वर जाते कारण वाफेत अग्नितत्त्व प्रभावी आहे व अग्नितत्त्वाची जागा पृथ्वीभोवतीचा सर्वात उंचीवरचा (म्हणजे जल व वायू यांच्याही वरचा) थर ही आहे. वाफ अग्नितत्त्वाच्या नैसर्गिक जागेकडे स्वत:हून (घरच्या ओढीने) जाते. उलट, उंच फेकलेला दगड खाली पडतो कारण दगडात पृथ्वीतत्त्व महत्त्वाचे आहे आणि पृथ्वीतत्त्वाची जागा पृथ्वीचा मध्य ही आहे. दगड मोठा असेल तर लवकर खाली पडेल; कारण मोठ्या दगडातील पृथ्वीतत्त्व अधिक प्रभावी असणार. त्यामुळे ॲरिस्टॉटलचा असा निष्कर्ष होता की, दगडाचा खाली पडण्याचा वेग दगडाच्या वजनाच्या प्रमाणात असतो. म्हणजे 'अ' वजनाचा दगड व '२अ' वजनाचा दगड एकाच उंचीवरून खाली टाकले तर मोठा दगड निम्म्या वेळात जमीनीवर पोचेल.

खाली पडणाऱ्या वस्तूंविषयीचे गॅलिलिओचे विचार त्याने काही पात्रातील संवादाच्या रूपाने मांडले आहेत. या पात्रांपैकी साल्व्हियाती हे पात्र म्हणते, "ॲरिस्टॉटलने आपला सिद्धान्त प्रयोग करून पडताळून पाहिला होता का, याविषयी मला शंका आहे." साग्रेडो नावाचे दुसरे पात्र सांगते की, "मी प्रयोग करून पाहिला आणि ॲरिस्टॉटलचा निष्कर्ष खोटा ठरला." साल्व्हियाती म्हणाला की, "प्रयोग करण्याची गरज नाही. युक्तिवादाने देखील आपण हे सिद्ध करू शकतो की, ॲरिस्टॉटलचा सिद्धान्त बरोबर नाही. समजा की, 'अ' आणि 'ब' असे दोन एकाच प्रकारचे गोळे आहेत. 'अ'चा खाली पडण्याचा वेग मिनिटाला ८ फूट तर 'ब'चा खाली पडण्याचा वेग मिनिटाला ४ फूट आहे. (म्हणजेच 'ब' हा गोळा 'अ' गोळ्याहून वजनाने हलका आहे.) आता 'अ' व 'ब' हे गोळे एकत्र बांधून 'क' ही वस्तू तयार झाली व ती आपण खाली टाकली. काय होईल? 'क' चा वेग 'अ' च्या वेगापेक्षा कमी असायला हवा, कारण 'ब' चा वेग कमी आहे. पण 'क' चे वजन 'अ' च्या वजनापेक्षा नक्कीच जास्त आहे. म्हणून 'क' चा खाली पडण्याचा वेग 'अ' च्या वेगापेक्षा जास्त असायला हवा. असा व्याघात इथे उत्पन्न होतो. म्हणून जे गृहीत आहे की, 'खाली पडण्याचा वेग वजनाच्या समप्रमाणात असतो,' ते चूक आहे"

हा थक्क करणारा युक्तिवाद १६व्या व १७व्या शतकात ज्या प्रकारचे वैज्ञानिक चिंतन होत होते, त्याची एक सुंदर वानगी आहे. ग्रीकांच्या नंतर विलोप पावलेले विज्ञान अशा युक्तिवादातून पुनः उदय पावू लागले होते. गॅलिलिओ हा स्वत:प्रयोग करण्यात निष्णात होता. पण प्रयोगापेक्षाही त्याला तार्किक युक्तिवादाची व विसंगती दाखविण्याची मातब्बरी अधिक वाटत असे. वैज्ञानिक उपपत्तीत आंतरिक सुसंगती असली पाहिजे हा प्रबोधन काळातील वैज्ञानिकांचा आग्रह होता.

ॲरिस्टॉटलच्या सिद्धान्तांची चिकित्सा करणारे विचारवंत ॲरिस्टॉटलपासून गॅलिलिओपर्यंत जो अठराशे वर्षांचा वावभर काळ लोटला, त्यात झाले नाहीत, असे








नाही. परंतु, ॲरिस्टॉटलच्या सिद्धान्तात विसंगती असल्याचे दाखवावे अगर प्रयोग करून तो सिद्धान्त पडताळून पहावा, असे कोणालाच का वाटले नाही, हे एक कोडेच आहे. खरे तर गॅलिलिओ ॲरिस्टॉटलच्या छायेतून बाहेर पडला असला, तरी ग्रीक विचारविश्वाविषयी त्याला आदरयुक्त आकर्षण होते व आर्किमिडीजने जे शोध लावले त्यांचा तर तो चाहताच होता. ॲरिस्टॉटलचे विचार १८०० वर्षांनंतरही उपलब्ध होते कारण अगदी सुरूवातीच्या ख्रिश्चन विचारवंतांनी ॲरिस्टॉटलचे विज्ञान व तत्त्वज्ञान यांना ख्रिस्ती धर्माच्या मूलतत्त्वांचा भाग करून टाकले होते. आर्किमिडीजचे ग्रंथ गॅलिलिओला प्राप्त झाले, कारण विलेय मोअरबेक नावाच्या फ्लेमिश अभ्यासकाने १३ व्या शतकात आर्किमिडीजच्या ग्रीक ग्रंथांची लॅटिनमध्ये भाषांतरे केली होती.

सारांश ग्रीकांचे विचार लोप पावले होते, विसरल्यासारखे झाले होते, हे म्हणणे खरे नाही. मग पाश्चात्त्य जगात विज्ञानही सतत विकसित का झाले नाही व जवळ जवळ दोन सहस्रकांनंतर विज्ञानाचे पुनरूज्जीवन करण्याची पाळी का आली? प्रबोधन काळातील यूरोपला ज्या शोधांचा अभिमान वाटला पाहिजे असे फ्रान्सिस बेकन या त्या युगातील श्रेष्ठ विचारवंताचे मत होते, ते तीन शोध म्हणजे छपाई, बंदुकीची दारू व होकायंत्र. यातील एकही शोध युरोपात लागला नव्हता. हे सर्व शोध चिनी लोकांनी लावले होते. चिनी संस्कृतीने उत्कृष्ट तंत्रज्ञान घडवले होते. ते लोखंडाच्या ओतीव वस्तू तयार करीत, उत्तम पूल बांधत. परंतु, त्यांनी वैज्ञानिक विचार विकसित केले, असे दिसत नाही. नैसर्गिक घटना काही वैश्विक नियमांना अनुसरून होतात अशा विचारापर्यंत ते पोचले नव्हते. चिनी व पाश्चात्त्य संस्कृतीतील फरक असा होता की, ख्रिस्ती धर्माला विवेकवादाची (रॅशनॅलिटी) आस होती तर चिनी अध्यात्माचे लक्ष्य समाजधारणा; हे होते. चीनमध्ये ग्रहमालेविषयीचे, बरोबर किंवा चुकीचे, सिद्धान्त निर्माण झाले नाहीत. त्यांनी भूमितीचे शास्त्र बनवले नाही; मोजमापे घेणे, जमिनीचे वाटप करणे अशा व्यावहारिक गोष्टींवरच त्यांची भूमिती थांबली.

चीनच्या धार्मिक विचारांत ताओपंथ, कन्फ्युशियसचा पंथ वगैरे अनेक पंथ निर्माण झाले. त्यांनी विश्वरचनेविषयी, मनुष्याच्या वर्तना-विषयी, नीतीच्या बाबतीत फार सखोल विवेचन केले आहे. परंतु, या सर्व विचारव्यूहात मनुष्य व निसर्ग यांच्यात तादात्म्य आहे, हा विचार मध्यवर्ती आहे. निसर्गापासून लांब राहून मनुष्य नैसर्गिक घटनांचा तटस्थपणे विचार करू शकतो, अशी शक्यताच या धर्म-विचारात संभवत नाही. ग्रीक संस्कृतीचा ज्या संस्कृतींवर प्रभाव पडला नाही,अशा सर्व संस्कृतींच्या बाबतीत हेच निरीक्षण नोंदवावे लागले. अशा संस्कृतीतील तत्त्वज्ञाने मनुष्याने वागावे कसे, हे सांगतील पण मनुष्येतर सृष्टीतील घडामोडींचे विवेकाधारीत विश्लेषण करू शकणार नाहीत.

पौर्वात्य संस्कृतीतील तत्त्वज्ञानातील या त्रुटीमुळे, कदाचित,या संस्कृतीत विज्ञानाचा उदय होऊ शकला नसावा. आईनस्टाईनला कोणी प्रश्न विचारला होता की, 'विज्ञानाचा उदय फक्त ग्रीसमध्येच का झाला, ग्रीसमधीलही फक्त उच्चवर्गातच विज्ञान का गोठून राहिले आणि नंतरही फक्त पाश्चात्त्यातच विज्ञानाची जोपासना का झाली?' त्याला आईनस्टाईनने उत्तर दिले होते की, 'पाश्चात्त्य विज्ञानाची उभारणी दोन महत्त्वाच्या उपलब्धींमुळे शक्य झाली. पहिली म्हणजे आकारिक तर्कशास्त्राचा उदय; दुसरी म्हणजे, प्रयोगाच्या आधारे कार्यकारणभावाची पडताळणी करता येते, हा शोध. चिनी विचारवंतांना या गोष्टी सुचल्या नाहीत, यात विशेष काही नाही. या दोन गोष्टींचा शोध कुणाला तरी लागला, ही आश्चर्याची गोष्ट आहे.'

ग्रीक संस्कृतीत विज्ञानाचा उदय व उत्कर्ष झाल्यानंतर युरोपात पुन: विज्ञानाचा अभ्यास सुरू झाला तो प्रबोधनयुगात, म्हणजे १८०० वर्षांनंतर. विज्ञानाच्या इतिहासात हा जो प्रदीर्घ खंड पडला त्याला रोमन सत्ता व ख्रिश्चन धर्म ह्या दोन गोष्टी कारणीभूत झाल्या. रोमन लोकांना ग्रीक संस्कृतीविषयी आदर असला तरी ग्रीकांचे








विज्ञान व तत्त्वज्ञान यांच्या बाबतीत त्यांना काहीच रस नव्हता. ख्रिस्ती धर्माच्याबद्दल बोलायचे तर असा दावा करता येणे शक्य आहे की, ख्रिस्ती धर्माने विवेकवाद (रॅशनॅलिटी), तर्कशुद्ध युक्तिवाद आणि शास्त्रशुद्ध चर्चा यांना प्रोत्साहन दिले व विज्ञानाच्या संवर्धनासाठी या गोष्टी महत्त्वाच्या आहेत. तसे असले तरी ख्रिस्ती धर्मातील मूळ समजुती- उदा. कुमारी माता आणि मृतांचे पुनरुत्थान- या विवेकवादाला न पटणाऱ्या आहेत. ख्रिस्ती धर्मातील हा दुहेरीपणा लक्षात घेऊन ख्रिस्ती धर्म व विज्ञान यांच्यातील संबंधाची चिकित्सा केली पाहिजे.

ख्रिस्ती विचारात एक मौलिक संकल्पना अशी आहे की, जग हे सुसंघटित असून काही नियमांना धरून चालणारे आहे. हे नियम ईश्वराने बनविले. ईश्वरानेच सर्व गोष्टी संख्येत मांडल्या जाव्यात याला मान्यता दिली. 'इश्वर अनंतापर्यंतच्या (इन्फिनिट) संख्या जाणतो' या मुद्याची चर्चा करताना सेंट ऑगस्टीन सांगतो की, 'ईश्वराने सर्व गोष्टी मोजमापात, वजनात व संख्येत मांडता याव्यात अशा तयार केल्या आहेत.' विज्ञानाचा इतिहासकार पियेर द्युहेय याने सांगितले आहे की, जुन्या मूर्तिपूजक धर्माने आकाशस्थ गोलांना जे देवत्व दिले होते, ते ख्रिस्ती धर्माने नाकारले व इथे विज्ञानाचे बीजारोपण झाले. हे म्हणणे मान्य केल्यास आपल्याला असेही म्हणावे की, आकाशस्थ गोलांचा पृथ्वीवरील घटनांवर प्रभाव पडतो हे मान्य केल्याने ग्रीकांचे विज्ञानही काही प्रमाणात कुंठित झाले होते. दुसऱ्या बाजूने असेही सांगता येण्याजोगे आहे की, फलज्योतीषावरच्या विश्वासाने का होईना, खगोलशास्त्राचा अभ्यास चालू राहिला.

ख्रिश्चन धर्मातील मोठा विचारवंत थॉमस ॲक्विनॉस याने ॲरिस्टॉटलचे विचार व ख्रिस्ती धर्मविचार यांची सांगड घालण्याचा प्रयत्न केला. त्यातूनच ख्रिस्ती धर्मविचारात भाव (बीइंग), सार (इसेन्स), कारण (कॉज) व उद्दिष्ट (एन्ड) या चार कल्पनांचा समावेश झाला. या चार कल्पनांच्या सहाय्याने सृष्टिविषयक विचारात जे प्राथमिक प्रश्न उद्भवतात - उदा. 'चंद्र कुणी निर्माण केला?' किंवा 'कशासाठी निर्माण केला?' - त्यांची उत्तरे शोधता येतात. १३व्या शतकाच्या मध्यास मुसलमानांचे (अरबांचे) राज्य स्पेनमध्ये पोचले. त्यातून मुस्लिम तत्त्वज्ञान व विज्ञान यांचा ख्रिस्ती तत्त्वज्ञान व विज्ञान यांचा संपर्क झाला. अरब विचारवंतांचे म्हणणे असे होते की, विज्ञान आणि धर्मविचार यांची क्षेत्रे पूर्णपणे स्वतंत्र ठेवली पाहिजेत. या विचारधारेला ॲक्विनॉसने विरोध केला. 'देवताशास्त्र' (थिऑलॉजी) हे देखील विज्ञानच आहे, असे तो म्हणे; कारण, देवाने मनुष्यजातीला जी मूलतत्त्वे उद्घाटन करून दाखवली त्यापासून नैगमत्तिक तर्कशास्त्राचा उपयोग करून देवताविषयक काही प्रमेये देवताशास्त्र सिद्ध करते. निसर्ग हा मनुष्यापेक्षा स्वतंत्र आहे व काही नियमांनी तो बांधलेला आहे. देवाचा निसर्गावर अंमल चालतो पण हा अंमलही काही नियमांना अनुसरूनच ईश्वराला चालवता येतो. अशा रीतीने निसर्ग हा ईश्वराच्या सर्वस्वी अधीन आहे; पण मनुष्याला मात्र स्वतंत्र इच्छाशक्ती आहे.

ॲरिस्टॉटलच्या विचारांचा ख्रिस्ती धर्मविचारात समावेश केल्यामुळे निसर्गाचे जे रूप तयार झाले ते पौर्वात्य धर्मविचारात निसर्गाची जी संकल्पना अनुस्यूत होती, त्यापेक्षा फार वेगळे होते. बौद्ध धर्मात 'सन्तान' ही महत्त्वाची कल्पना आहे. या कल्पनेनुसार दर क्षणाला सर्व वस्तू संपतात व पुन: अस्तित्वात येतात. 'पुनर्जन्म' हे ख्रिस्तपूर्व धर्मांचे मध्यवर्ती तत्त्व आहे. त्यामुळे या धर्मांचा प्रभाव असणाऱ्या संस्कृतीतून विज्ञान जन्मत:च मारले गेले. निसर्गावर काही नियमांचे प्रभुत्व कार्यकारणभावाच्या आधाराने चालते या तत्त्वाला विरोधी अशी पुनर्जन्माची संकल्पना आहे.

सारांश, वोल्पर्ट यांच्या मते, १६व्या शतकात युरोपात विज्ञानाच्या कोळपून गेलेल्या रोपाला पुन: धुमारे फुटायला ख्रिस्ती धर्माने ॲरिस्टॉटलचे विचार सामावून घेतले व मूळ ग्रीक परंपरेला उठाव दिला, हे एक कारण होऊ शकते. मुस्लिम विद्वानांनीही ग्रीक परंपरेला






नवजीवन मिळण्याला हातभार लावला. विज्ञानाचा झरा युरोपात पुन: वाहू लागण्यास आर्थिक घटकही कारणीभूत झाले, असे मॅक्स वेबर या समाजशास्त्रज्ञाचे म्हणणे आहे. वस्तुविनिमयावर चालणाऱ्या अर्थव्यवस्थेचे जितके आधुनिकीकरण झाले तितक्या प्रमाणात धार्मिक निर्बंधांचा पगडा कमी होत गेला. पैशात वस्तूंचे मूल्य सांगण्यातून आकडेमोड व संख्येत वस्तूचे (एक प्रकारचे) रूपांतर यांना चालना मिळाली. रोमन आकडे बेरीज-वजाबाकी करण्यास अवघड असल्याने ते टाकून देऊन तेथे मूळ हिंदुस्थानी पण अरबांच्या मध्यस्थांतून युरोपात पोचलेले आकडे वापरले जाऊ लागले.

आधुनिकीकरण ही संकल्पना वेबरच्या विचारांच्या केंद्रस्थानी आहे. ही संकल्पना बरीच गुंतागुंतीची असली तरी त्यातील कळीचा मुद्दा असा आहे की, 'परंपरेने आलेल्या प्रघातांची चिकित्सा न करता स्वीकार करण्याऐवजी स्वहित साधण्यासाठी विचारपूर्वक परिस्थितीशी जुळवून घेण्याची कोशीस करावी' इथे जो 'स्वहित' हा शब्द वापरला आहे, तो महत्त्वाचा आहे. 'स्वहित' साधण्यातूनच विज्ञानाची प्रगती होते. स्वहित-साधना हा आकलनाचा राजमार्ग आहे; आकलन हा स्वहित-साधनाचा मार्ग नव्हे! या सर्वांचा भांडवलवादाच्या उदयाशी निकटचा संबंध आहे. परंतु वेबर सांगतो की, भांडवलवादी माहोलातूनच केवळ विज्ञानाची प्रगती झाली असे नाही. मार्टीन ल्यूथरने ख्रिस्ती धर्माच्या सुधारणेची मोहीम हाती घेतली आणि प्रॉटेस्टंट पंथाची स्थापना केली. त्यातून एक नवी नीती (एथिक)युरोपाच्या काही भागात लोकप्रिय झाली. या नीतीने लोकांमध्ये प्रगतीचा व विवेकनिष्ठ संशोधनाचा संदेश पसरविला.

वोल्पर्टनी आतापर्यंत हे आग्रहाने सांगितले आहे की, ज्या संस्कृतींवर ग्रीकांचा प्रभाव होता अशा संस्कृतीतच फक्त विज्ञानाचा विकास घडू शकला. पण हे मत संस्कृतींच्या अभ्यासकांना मान्य नाही. हे अभ्यासक असे ठामपणे सांगतात की, विज्ञान म्हणून ज्यांना गणावे अशा विचारधारा आफ्रिकेतील अगदी प्राथमिक अवस्थेत असणाऱ्या टोळ्यांमध्येही आढळतात. परंतु, वोल्पर्ट असे प्रतिपादतात की, सृष्टीतील घटनांचे या टोळीतील जादूगार किंवा चेटुककार यांनी दिलेले स्पष्टीकरण सकृत् दर्शनी जरी विज्ञानपूत वाटले, तरी या स्पष्टीकरणात वैज्ञानिक स्पष्टीकरणात सहज आढळणारे घटक असत नाहीत. ही स्पष्टीकरणे बहुधा दंतकथांच्या रूपाने दिलेली असतात. परंतु, त्याच घटनेचा खुलासा देणारी पर्यायी स्पष्टीकरणे - मग ती भलेही दंतकथात्मक असोत - या संस्कृतीत आढळत नाहीत. विचारव्यूह अशा बंदोबस्ताने रचलेला असतो की पर्यायी स्पष्टीकरण व संस्कृतीने स्वीकारलेले स्पष्टीकरण यांच्यात कुठे संवादच होऊ शकत नाही.

आझान्दे नावाची एक टोळी आहे. या टोळीतील व्यक्तीला वाटत असते की, आपल्या विचारात चूक अशी काही असूच शकत नाही. कारण या टोळीतील व्यक्तींच्या धारणांचे जाळे असे घट्ट विणलेले असते की, व्यक्तीचे विचार त्या जाळ्यातून पलीकडे जाऊच शकत नाहीत. हे जाळे एवढेच प्रत्येक व्यक्तीचे विचारविश्व असते. या धारणांना खोटे ठरवील असा अनुभव आला तरी तो अनुभव त्या धारणा खोटे ठरविण्याचा पुरावा म्हणून या विश्वात मानलाच जात नाही.

आफ्रिकेत ज्या परंपरानिष्ठ टोळ्या आहेत त्यांच्या बाबतीत ही नोंद करण्याजोगी गोष्ट आढळते की, टोळीच्या दृष्टीने जो महत्त्वाचा प्रश्न असेल त्याविषयी आपणाला काही माहीत नाही याची कबुली द्यायला टोळीतील सदस्य तयार नसतात. 'जग कसे निर्माण झाले?' या प्रश्नाविषयी आपल्याला काही माहिती नाही, हे कबूल करायला टोळीवाले तयार होतील. कारण त्या प्रश्नाशी त्यांना काहीच देणे-घेणे नसते. पण आजार-पण, पिकांची स्थिती या विषयी विचाराल तर ते हमखास काही ना काही स्पष्टीकरण देतील. कोणतीही महत्त्वाची घडामोड होवो, तिचे काही ना काही स्पष्टीकरण दिल्याखेरीज ते राहणार नाहीत. समजा, कुणी तरी, झाड पडल्यामुळे, चिरडून मेला, तर








सूड किंवा करणी यांच्या आधाराने हे टोळीवाले त्या माणसाच्या मरणाचा खुलासा देतील. यदृच्छा, योगायोग, अनपेक्षित घटना या गोष्टींना या टोळीवाल्यांच्या विचारव्यूहात स्थान नसते. त्यामुळे संभाव्यतेचा (प्रॉबेबिलिटी) विचारच या लोकांच्या मनाला स्पर्श करत नाही. 'संभाव्यता' ही संकल्पना विज्ञानाच्या चौकटीत फार महत्त्वाची ठरलेली आहे.

सृष्टीतील घडामोडींच्या खुलाशात रस न वाटणे ही गोष्ट विज्ञानाच्या प्रगतीला घातक आहे. थेल्स व ग्रीक यांनी नैसर्गिक घटनांबाबत 'असे का?' 'हे कसे घडते?' 'याचे कारण काय?' असे प्रश्न सतत स्वत:ला विचारले म्हणून विज्ञान निर्माण झाले. यातुविद्या (जादू) व विज्ञान यांच्यातील फरक सांगताना कीथ थॉमस म्हणतो की, 'जगाच्या घटनेबद्दलची मूलतत्त्वे एकदा स्वीकारली की, त्यानंतर कोणतीही विरोधी घडामोड झाली तरी मूलतत्त्वांवर श्रद्धा ठेवणाऱ्याच्या श्रद्धेला धक्का पोचत नाही, हे यातुविद्येच्या भक्तांचे वैशिष्ट्य असते. ही विरोधी घडामोड तो या-ना-त्या मार्गाने विल्हेस लावतो. विज्ञानाची विचाराची पद्धती याच्या अगदी उलट असते.'

जगात पूर्वी यातुविद्येवर सर्वांचीच मदार असे. करणी, चेटूक, भानामती, कर्णपिशाच्च या लोकांच्या जीवनशैलीचा भाग बनलेल्या गोष्टी होत्या. या कवटाळातून 'मनुष्य जात बाहेर कशी पडली? त्याचे उत्तर धार्मिक विचार व विवेकवाद यांचा जो पुरस्कार ख्रिस्ती-धर्म-संघटनेने केला त्यात आढळते. विज्ञानामुळे यातुविद्येवरील विश्वास उडाला, हे खरे नाही, असे कीथ थॉमसच्या ग्रंथावरून दिसते.'

थॉमस सांगतो की, प्रबोधन युगात विज्ञान व तंत्रज्ञान यांची पायाभरणी होण्याच्या पूर्वीच यातुविद्येच्या ऱ्हासाला सुरूवात झाली होती. १३व्या व १४व्या शतकात चर्चचा असा दावा असे की, आम्ही आमच्या दैवी सामर्थ्याने लोकांना आजारपण किंवा वांझोटेपण यापासून संरक्षण देऊं शकतो. लोलार्ड नावाचा एक पंथ त्या वेळी उदयास आला. या पंथाने चर्चचा हा दैवी सामर्थ्याचा दावा फेटाळून लावला. इथे हे ध्यानात घेतले पाहिजे की, दैवी सामर्थ्याची कल्पना फेटाळून लावताना लोलार्ड पंथाने लोकांपुढे कोणत्याही पर्यायाचे गाजर धरले नव्हते. १७व्या शतकात लोक नवस-सायासांची कास सोडून औषधावर रोगमुक्ततेसाठी विश्वास ठेवू लागले खरे, पण त्याला कारण वैद्यकात काही महत्त्वाचे शोध लागले होते, हे नाही. किंबहुना १९व्या शतकापर्यंत विज्ञानाचा उपयोग करून नवी आरोग्यदायी औषधे शोधून काढता येतात, असा अनुभव मनुष्यजातीला आलेला नव्हता.

पूर्वी काय किंवा आजही काय सामान्य मनुष्याच्या विज्ञान, धर्म व यातुविद्या यांच्याबद्दलच्या समजुती शिक्षण घेताना किंवा थोरामोठ्या अधिकारी व्यक्तींकडून जे सांगितले गेले त्यावर अवलंबून असतात. अर्नेस्ट जोन्स हे एक मानसशास्त्रज्ञ आहेत. ते म्हणतात, "तीनशे वर्षापूर्वी जो पुरावा सर्वसाधारण माणसास चेटुकावर विश्वास बसण्यासाठी पुरेसा वाटला असता, तो आता वाटत नाही. पण याचा अर्थ असा नाही की चेटुकाच्या घटनेसंबंधी काही नवीन आकलन समाजात पसरले आहे."

कित्येक जीवशास्त्रीय तत्त्वे अशी आहेत की, पुरेशी चिकित्सक वृत्ती मनुष्यांच्या अंगी नसेल तर त्यांची त्यांची सत्यता माणसाना पटत नाही. ऑस्ट्रेलियातील काही आदिवासी जमातीत अशी समजूत आहे की, स्त्री-पुरूषांचा संबंध हे गर्भधारणेचे कारण नाही; गर्भधारणेची ती एक अट आहे. 'गर्भधारणेचे खात्रीलायक कारण म्हणजे स्त्रीच्या ठिकाणी चैतन्यरूप अपत्याने प्रवेश करणे हे होय. हे चैतन्यरूप अपत्य काही विशिष्ट ठिकाणाहून येते. अशी ठिकाणे म्हणजे टोळीचे प्रतीक (टोटेम), कोणते तरी अन्न किंवा वादळ अशा प्रकारची असतात.' अशा तऱ्हेची जी समजूत असते ती काही ऊहापोहातून किंवा विचारातून निर्माण होत नाही; त्याच बरोबर त्या समजुतीला बळकटी मिळेल असे पुरावेही मिळतात. उदा. वयात आलेल्या मुलीला लग्नापूर्वी गर्भधारणा होत नाही; यावरून हे कळते की, पुरूषसंबंध ही गर्भधारणेची

अट आहे. त्याच बरोबर पुरूषसंबंध झाल्याने गर्भधारणा होतेच असे नाही; म्हणजे पुरूषसंबंध व गर्भधारणा यातील कार्यकारणभाव सकृत्दर्शनी लक्षात येणारा नाही. आता काही मानव-शास्त्रज्ञ (अॅन्थ्रोपॉलॉजिस्ट्स) असे सांगतात की, आदिवासीना पुरूषसंबंध व गर्भधारणा यांच्यातील नाते माहीत नाही, यावर विश्वास बसत नाही; कारण जनावरातील शरीरसंबंध व मादीला गर्भधारणा होणे या गोष्टी त्यांनी पाहिलेल्या असतात. परंतु, इथे हे लक्षात घेतले पाहिजे की, इंग्लंडमध्ये देखील १९व्या शतकाच्या सुरूवातीपर्यंत पुरूषसंबंधाचे जीवशास्त्रीय कार्य माहीत झालेले नव्हते.

सर्व संस्कृतीतून हजारो वर्षे लोकांच्या मनावर दंतकथा व विश्व-निर्मिती-कथा यांची मोहिनी पडली होती. निसर्गाबाबत जिज्ञासा व चिकित्सा यांचा आढळ होत नव्हता.

निसर्गातील एखाद्या घटनेचा माणसाच्या राहणीवर परिणाम होणार नसेल, तर माणसाला त्या घटनेशी काही देणे-घेणे असत नाही. निरनिराळ्या संस्कृतीतून हजारो वर्षे, निसर्गाचा केवळ जिज्ञासेपोटी अभ्यास करावा, ही वृत्ती दिसून आली नाही याचा या वेगळा कोणता खुलासा असू शकतो? वेगवेगळ्या संस्कृतीचे इतिहास तपासून पाहता असे आढळून येते की, विज्ञानाचे रोप जन्माला येणे, हा केवळ यदृच्छेचा भाग आहे. विज्ञानाचा जन्म होण्यास उपकारक अशी परिस्थिती फक्त एकदाच व एकाच ठिकाणी, म्हणजे ग्रीसमध्ये, निर्माण झाली. मनुष्याच्या जन्माची व उत्क्रान्तीची कथा देखील अशीच आहे. आफ्रिकेतील एका अरण्यात बुद्धीमान मनुष्यप्राण्यात उत्क्रांत होईल असा जीव निर्माण झाला. परिस्थितीच्या अनुकूलतेत थोडी जरी उणीव असती तरी तो जीव तेथेच संपला असता व आजचा सुसंस्कृत व उत्क्रान्त मानव कधीच घडला नसता. स्टीफन गुल्ड याने 'वन्डरफुल लाईफ' या पुस्तकात म्हटले आहे की, 'मनुष्य प्राणी धिप्पाड व बुद्धीमान सस्तन जीव म्हणून अस्तित्वात आहे. याला कारण त्याचे ग्रहच उच्चीचे होते!'

विज्ञानाची स्थिती तशीच आहे. विज्ञानाचा उदय झाला तो काही तसे होणे अटळ होते, म्हणून नाही. त्याचप्रमाणे विज्ञानाला पोषक असा चिकित्सेचा माहोल ख्रिश्चन धर्म आणि भांडवली अर्थव्यवस्था यांच्या छत्राखाली निर्माण झाला तोही योगायोगच होय. या साऱ्याचे श्रेय कोणाला द्यायचे हा प्रश्नच आहे. कदाचित्, याबद्दलही ग्रहस्थितीलाच धन्यवाद द्यावे लागतील. नाही तरी विज्ञानाची बरीचशी प्रगती ग्रहगोलांच्या अभ्यासातूनच झाली! ग्रह नसते, तर कोपर्निकसही झाला नसता. पण मिलेटोसचा थेल्स याचे महत्त्व मान्य करणे भागच आहे. विज्ञानाच्या जन्मासाठी आपण थेल्स व त्याचे समकालीन यांचे ऋणी असले पाहिजे. प्रा. लुईस वोल्पर्ट हे युनिव्हर्सिटी कॉलेज, लंडन, इथे वैद्यकीय उपयुक्त असे जीवशास्त्र शिकविणारे प्राध्यापक असून आकाशवाणीवरून विज्ञानविषयक कार्यक्रम करीत असतात. रॉयल सोसायटीचे ते सभासद आहेत. त्यांचे दी अननॅचरल नेचर ऑफ सायन्स हे पुस्तक १९९२ साली प्रसिद्ध झाले. विज्ञानाविषयी सर्व सामान्य लोकांचे गैरसमज कसे व का असतात, सामान्य समजूत (कॉमन सेन्स) व विज्ञान यांच्या निष्कर्षात फरक का पडतो, विज्ञान हे सुंदर कसे आहे व त्याला महत्त्व का आले अशा प्रश्नांची उद्बोधक व मनोरंजक चर्चा हे पुस्तक करते. हा लेख सदर पुस्तकातील तिसऱ्या प्रकरणाची ओळख करून देतो.



# तीर्थिकांचा तर्क

*डॉ. मो. गो. धडफळे*

**तर्कशास्त्र की न्यायशास्त्र? :**

कै. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा व माझा त्यांच्या निधनापूर्वीच्या तीन दशकात अतिशय घनिष्ठ संबंध आला होता. संस्कृत व भारतविद्या याविषयी अनेकदा रंगतदार चर्चा होत असे. वंगीय संस्कृत परिषदेची 'तर्कतीर्थ' ही पदवी फार असामान्य अशी प्राप्ती नाही. महाराष्ट्रात व इतरत्र अनेक विद्वानांनी काव्यतीर्थ, पालितीर्थ, मीमांसातीर्थ, तर्कतीर्थ या पदव्या मिळवल्या आहेत. मात्र लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी त्यांच्या चिकित्सक, बुद्धिवादी, स-प्रमाण अशा विचारपद्धतीमुळं या पदवीला मानाचं स्थान मिळवून दिलं असं म्हणायला हवं. वस्तुत: 'तर्क' हा शब्द हेतुविचार (Reasoning) या अर्थानं प्राचीन साहित्यात व शास्त्रवाङ्मयातही वापरला जात असला तरी एकूण Logic साठी मात्र शास्त्रीय संज्ञा, 'न्यायशास्त्र' हीच आहे. मराठीत 'न्याय' हा शब्द Law (कायदा) या अर्थानं अधिक रूढ आहे. तशाप्रकारच्या चार वर्णांच्या, आश्रमांच्या, सामाजिक रिवाजांच्या, आर्थिक व्यवहारांच्या, अपराधांच्या व त्याबाबतीतील शिक्षा (सजा) या स्वरूपाच्या विषयांचा ऊहापोह करणाऱ्या विद्याशाखेची अधिकृत संज्ञा 'धर्मशास्त्र' आहे. 'स्मृति' ग्रंथांचा मुख्य विषय धर्मशास्त्र हाच आहे. शास्त्रीजी आपल्या गुरूंप्रमाणे (केवलानंद सरस्वती) धर्मशास्त्रात विशेष पारंगत होते.

ते मला (बौद्ध परंपरेत 'स्मृती') आहेत कां हा प्रश्न नेहमी विचारायचे. भिक्षुभिक्षुणींसाठी घालून दिलेली आचारसंहिता विनयपिटकात आढळते. विनय म्हणजे Discipline. दीघनिकायातील एखाद्या श्रावकांसाठीही आचाराचे नियम घालून दिले गेले आहेत पण सर्वसाधारणपणे मात्र 'बौद्ध' परंपरेत 'स्मृतिग्रंथ' अभावानेच आढळतात. 'तर्क' हा शब्दही शास्त्रत: निर्दोष विचारपद्धती या अर्थानं येत नाही. तीर्थिक ('तीर्थंकार' नव्हे) हा काहीसा Sophist वा 'वाक्छलवादी' या निंदाव्यञ्जक अर्थानंच अधिक वापरला गेला आहे. या सर्व प्रकाराचं एकूणच आश्चर्य आबांना वाटायचं. मी त्यांना त्यांच्या ८६ व्या वाढदिवशी म्हणालो, "आबा, या वर्षात मी नक्की 'नवभारत' साठी 'तीर्थिकांचा तर्क' असा लेख खास तुमच्यासाठी म्हणून लिहिणार आहे." माझ्या आश्वासनांवर त्यांचा फार विश्वास नव्हता. "लिहा म्हणजे वाचीन" येवढंच म्हणाले. त्यांच्या हयातीत त्यांना दिलेलं वचन मी पूर्ण केलं नाही.

इतरांना याविषयी काही माहिती मिळावी येवढाच आता या लेखाचा उद्देश उरणार आहे. आन्वीक्षिकी: कौटिल्यानंही त्याच्या अर्थशास्त्रात प्रारंभीच त्रयी विद्या (तीन वेद), वार्ता (उपजीविकाशास्त्र) व दण्डनीती (कायदेकानून) या तीन विद्यांच्याही आधी 'आन्वीक्षिकी' विद्या उल्लेखिली आहे. "प्रमाणैरर्थपरीक्षणं न्याय:" हे न्यायाचं लक्षण दिलं जातं. तर 'आन्वीक्षिकी' विषयी कौटिल्य म्हणतो-

"प्रदीप: सर्वविद्यानामुपाय: सर्वकर्मणाम्।
आश्रय: सर्वधर्मणा: शश्वदान्वीक्षिकी मता ॥"

(द्वितीय: अध्याय:)

आन्वीक्षिकीस्थापना म्हणजेच तत्त्वज्ञानाच्या क्षेत्राचे निर्धारण येवढी महती आन्वीक्षिकीची आहे. 'तर्क' हा जवळजवळ आन्वीक्षिकीचा पर्यायशब्दच मानायचा.








तर्कासाठी वेदानुसंधानः

"वेदशास्त्राला विरोधी न जाणाऱ्या तर्काच्या साह्याने ऋषिप्रणीत धर्मोपदेशाचा जो मागोवा (अनुसंधान) घेतो तो धर्म जाणतो, दुसरा कोणी जाणत नाही" अशा शब्दात मनूने तर्काची भलावण केली आहे.

"आर्षं धर्मोपदेशं च वेदशास्त्राविरोधिता।
यस्तर्केणानुसंधत्ते स धर्मं वेद नेतरः ॥"

(मनुस्मृतिः१२.१०६) भरतमुनींच्या नाट्यशास्त्रावरील अभिनवभारती या आपल्या टीकेत अभिनवगुप्तदेखील म्हणतो की आगमांखेरीज केवळ अनुमानानं अवगत होणारा धर्म ठरू शकत नाही. (न चागमादृते धर्मः अनुमानगम्यः इति न्यायात्। भरतनाट्यशास्त्र १.१ यावरील टीका) तर्काच्या या प्रशंसेने आपले ऊर भरून जात असतांनाच तर्कनिन्देचा सूरही अलगद कानी पडू लागतो.

**तर्क-निंदा :**

भारतीय तत्त्वज्ञानाचे प्रमुख आकरग्रंथ म्हणून उपनिषदांकडे पाहिलं तर ती एकमुखाने परमतत्त्वाच्या प्राप्तीविषयी तर्काला हतबल मानत असल्याचे दिसते. "नैषा तर्केण मतिरापनेया" कठोपनिषद् (२.९) आपल्याला सांगते ब्रह्मबुद्धी म्हणजे ब्रह्मज्ञान तर्कानं प्राप्त होणार नाही.

ब्रह्म हे सूक्ष्म असल्याने ते तर्कग्राह्य नाही हे ही कठोपनिषद् आपल्याला सांगते. 'हयतर्क्यमणुप्रमाणात्' (कठ.२.८). परमात्मा हा अपरिमित, अज, 'अतर्क्य' व अचिन्त्य असल्याचं मैत्रायणी-उपनिषद् (६.१७) सांगतं.

**बुद्धाचा धर्म ही अतर्कावचर :**

केवळ औपनिषद ब्रह्मच नव्हे तर गौतमबुद्धाचा 'धर्म' ही 'अतक्कावचर' (अतर्कावचर) आहे. जैनांच्या स्याद्वादाचे रूप पाहता ते ही सत्याभिमुख असूनही तर्काभिमुख आहे असं म्हणता येणार नाही.

**तर्कनिंदा कां? :**

तर्काची भलावण आस्तिक दर्शनांनी केली नाही हे पाहिल्यावर निदान नास्तिकांनी तरी तर्काला उचलून धरले असेल अशी आशा पल्लवित होते.पण नास्तिकही तर्काची तळी उचलून धरत नाहीत. नास्तिक शिरोमणी बृहस्पती (चार्वाक) हा प्रत्यक्षापलीकडचं अनुमान प्रमाण मानायला तयार नाही. ज्ञातापासून अज्ञाताकडे घेवून जाणाऱ्या अनुमानात अभिप्रेत असलेली तार्किक उडी (Logical Leap) घ्यायला लोकायत तयार नाही. जैनांच्या स्याद्वादात तर्कानुकूलता नाही हेही आपण पाहिल. बौद्धविचारही अ-तर्कावचर,आहे. तर्काचा असा कोणता मोठा दोष आहे ज्यामुळे तर्क नाकारला जातो? ब्रसूत्रकारांनी व त्याना अनुसरुन भाष्य लिहिणाऱ्या शंकारादी भाष्यकारांनी तर्कातील ठळक मोठा दोष सुस्पष्टपणे सांगून त्याचे पुरेसे विवरण केले आहे. "निरागमाः, पुरुषोत्प्रेक्षामात्रनिबन्धतास्तर्का अप्रतिष्ठा भवन्ति उत्प्रेक्षत्या निरङ्कुशत्वात्। (शाङ्करभाष्य. ब्रह्मसूत्र २.१.११)" आगमांचा म्हणजे वेदांचा आधार नसणारे, केवळ पुरूषांनी कल्पना लढवून मांडलेले तर्क प्रतिष्ठित (भक्कम) ठरत नाहीत कारण उत्प्रेक्षेला काही अंकुशच नसतो. आज एक वैज्ञानिक एक उपपत्ती मांडतो. तर उद्या दुसरा तिचे खंडन करून वेगळीच उपपत्ती मांडतो. यात चुकीची उपपत्ती बाद होऊन, निर्दोष उपपत्ती स्वीकारली गेली हे प्रगतीचे पाऊल वाटेल खरं पण यात 'अप्रतिष्ठितत्त्व' (कायमचे स्थिर न राहणे) हा दोष राहतोच. न्यूटनचा 'गतिसिद्धान्त' बाद ठरवून आईनस्टाईन 'सापेक्षता सिद्धान्त' मांडतो व इतर जगन्मान्य वैज्ञानिक तो स्वीकारतात येथपर्यंत ठीक आहे. उद्या एखाद्याने सापेक्षता सिद्धान्तातील दोष दाखवून पुनश्च न्यूटनच्या गतिविषयक नियमांची, खण्डन न करता येण्याजोगी प्रतिष्ठापना केली तर काय? याबाबत निश्चिती कधीच होणार नाही. ज्ञान तर निश्चित असावयास हवे. तशा आपल्या अपेक्षा नसल्यास प्रांजळपणानं आपला संशयवाद, अज्ञेयवाद, अनिश्चेयवाद कबूल करायला हवा. बायबलच्या शैलीची नक्कल करून म्हटलं जातं. Nature and Nature's laws lay hid in night. God said, "Let Newton be and all was








अनुक्रमणिका

light!
But not for long the Devil hawling " Let Aeinstein be
Restored the ' Status quo '

**तर्क म्हणजे Logic का?**

बौद्ध-संकरित-संस्कृत-साहित्यात (Buddhist Hybrid Skt.Lit.) 'तर्क' हा शब्द 'वावदूकपणा', 'बोलण्यातील लबाडी' (Sophistry), 'वृथा तर्कटपणा' 'वांझोटा तर्क' असा निन्दाव्यञ्जक अर्थानंच बहुधा वापरला गेला आहे; योग्य अनुमान या अर्थानं नव्हे.

खरं तर भारतीय साहित्यातील तर्कनिन्दा ही लॉजिकची निंदा समजू नये. लॉजिकसाठी आपल्याकडील मान्य संज्ञा ही 'आन्वीक्षिकी' किंवा खरीतर 'न्याय' अशी आहे. प्राचीन भारतीय विद्यांमध्ये धर्मशास्त्र म्हणजे Law व न्याय म्हणजे Logic.

तर्क हा शब्द 'तर्क् गतौ' या धातूपासून निपजला आहे. गती ही शारीरिकही असू शकते व मानसिक (बौद्धिक) ही. शंकराचार्य अनेकवार 'गतिरवगतिरेव' असं भाष्य करतात. मराठीत आजही आपण अमक्याला या विषयात विशेष गती (ज्ञान) असल्याचं म्हणतो. शारीरिक गतीचा निदर्शक असणाऱ्या 'तर्क्' धातूपासून निष्पादित असा संस्कृतातील शब्द म्हणजे 'तर्कुः' (टकळी - जी सूत कातण्यासाठी सतत फिरत असते, गतिशील असते.) हा शब्द सिद्ध होतो. गती या संकल्पनेमध्ये कमालीची व्यापकता आहे. पुढे, मागे, बाजूला, वर, खाली, तिरकी, आंत, बाहेर अशा प्रकारच्या विविध गतींमध्येच एका वस्तूतून किंवा विधानातून दुसरी वस्तू वा विधान 'काढणे', 'नि-गमन' (de-duction) हा अर्थही अभिप्रेत आहे. मृच्छकटिकाच्या पहिल्या अंकात विटाला बरोबर घेऊन शकार अंधारांत वसन्तसेनेचा पाठलाग करून तिला पकडण्याच्या खटाटोपात असतो. आपल्याला असे कां वागविले जाते आहे हे समजून घेण्यासाठी वसन्तसेना विटाला विचारते, "किं अस्मात् किमप्यलङ्करणं तर्क्यते(तक्किअदि)?" Is any ornament to be derived from us? Derivation म्हणजे निष्कासन हा ही तर्काचा अर्थ आहे. मुख्य विधान व उपविधान यांच्यातून 'निष्कर्षण' करून (Conclusion) निगमन पद्धतीनं तर्कशास्त्रात निर्णय (निष्कर्ष) काढला जातो. यात 'तर्क' या पदात कोणतीही सदोषता नाही. अमृतनादोपनिषदात (२.६) चांगल्या अर्थानं 'तर्क' हा शब्द वापरला गेला आहे.

"प्रत्याहारस्तथा ध्यानं प्राणायामोऽथ धारणा।
तर्कश्चैव समाधिश्च षडङ्गो योग उच्यते ॥"

हेच उपनिषद् पुढं हे ही सांगतं की (३.१६)

"आगमस्याविरोधेन ऊहनं तर्क उच्यते।
यं लब्ध्वाऽप्यमवन्येत स समाधिः प्रकीर्तितः ॥"

"आगम म्हणजे वेद यांना विरोध न करता एखादी अटकळ बांधणे म्हणजे 'तर्क' लढवणे." व्याख्याकार नारायण आपल्या दीपिकेत 'तर्को मननम्' असं साधं सोपं स्पष्टीकरण देतो.

**योगात 'वितर्क' म्हणजे हिंसा:**

योगसूत्र २.३३ वरील योगवार्तिकात विज्ञानभिक्षू त्या संप्रदायात वितर्क या शब्दाला 'हिंसादिक' असा तान्त्रिक अर्थ असल्याचे सांगतो (वितर्कभावने प्रतिपक्षभावनम्। विपरीतास्तर्का विचारा येष्विति। वितर्कसंज्ञा हिंसादिषु तान्त्रिकी। तर्कश्चात्र विशेषणं तथाच वितर्क्यमाणो हिंसादिर्वितर्कः।)'

जसा वाईट अर्थ 'तर्का' ला अशा ठिकाणी प्राप्त होतो तसाच 'फसवणं/ठकवणं' असे वाईट अर्थ 'आन्वीक्षिकी' या तर्कपर्यायाला मालतीमाधवादिक प्रकरणात प्राप्त झाले आहेत. धरानन्द व जगद्धर यांच्या टिप्पण्या पहाण्याजोग्या आहेत. धरानन्द म्हणतो- "आन्वीक्षिकी तर्कविद्या। तेन चोरिका विवाहकुशलत्वम्" तर्क म्हणज 'फसवणूक' यात गती असल्यानं 'खोटा विवाह' खऱ्यासारखा वठवता येतो. जगद्धर हेच सांगतो. आन्वीक्षिकी न्यायशास्त्रं, तत्र









अनुक्रमणिका

तर्क -च्छलादिनिष्ठाङ्गत्वेन तदभ्यासान्माधवस्य चोरिकाविवाहकौशलमुक्तम् (आन्वीक्षिकी म्हणजे न्यायशास्त्र. त्या शास्त्रातील तर्क, छल इत्यादी अंगांच्या आधारानं माधव हा नायक, नायिकेच्या रूपात नंदन या खलनायकाशी 'फसवा' विवाह करतो.) आता 'तर्क' निंदा कां होत असे याचं 'यौगिक' (निर्वचनपर) कारण उघड होतं. संस्कृत 'तर्क' हाच धातू आंग्लभाषेतील trick 'फसवी युक्ती' या शब्दात आढळतो. ग्रीक 'सोफिस्ट', भारतीय 'तीर्थिक' या फसव्या तर्कशास्त्राने अनेकांना वैचारिक 'चकवे' देत असत. पालि-अट्ठकथाकार याचे काही मासले सादर करतात. काको सेतो (काकः श्वेतः - 'कावळा पांढरा') अट्ठीनं सेतत्ता (अस्थीनां श्वेतत्वात् - हाडं पांढरी असल्यानं.) बैजि नावाचा एक भर्तृहरीच्या पूर्वीचा (वाक्यपदीय.२.४१८ पहा) वैयाकरण होता. तो तार्किक छलाचा वापर करून व्याडी व पतंजली यांच्या व्याकरणविषयक विधानांची हेटाळणी करायचा.

Folk-lore ('लोकसाहित्य' नव्हे) म्हणजे 'लोकविद्या' (वेदविद्येखेरीज). याचं महत्त्व मध्यन्तरी डॉ. रा. चिं. ढेरे, डॉ. श्रीमती तारा भवाळकर इत्यादिकांना बरंच आकृष्ट करीत होतं - अजूनही करीत आहे. आजकाल मात्र Folk-lore की Feck-lore असाही एक मतप्रवाह पाश्चात्त्य जगतात प्रसृत होत आहे. (यावर स्वतंत्र लेखन मी यथावकाश करू इच्छितो.)

**पालि-साहित्यातील 'तर्क':**

पालीतील त्रिपिटक व तदितर साहित्यात तर्काला चांगले व वाईट असे दोन्ही अर्थ असल्याचं आढळतं.

दाठावंस हे पालि-काव्य (५.२२) 'तक्कागम' (तर्कागम) हा शब्द 'योग्य विचार पद्धती' या अर्थानं वापरतं. त्रिपिटक मात्र बुद्धाचा धर्म 'अतक्कावचर' (अतर्कावरचर) म्ह. Gogerly च्या अनुवादानुसार 'unatainable by reasoning' 'विचारप्रणालीने प्राप्य न होणारा', 'तर्कातीत' असा आहे हे सांगतं (पहा विनय. १.९=दीघनिकाय १.१२=संयुक्तनिकाय १.१३६=मज्झिमनिकाय १.४८१ हे व इतर सर्व संदर्भ पालि-ग्रन्थ-माला, लंडन यांच्या प्रकाशित ग्रंथांचे आहेत.) सुत्ततिपातात (९७२) मात्र 'तक्कासय' (तर्काशय) म्हणजे 'संशयाला जागा असणं', जातकात(१.९७) तक्कगहन (तर्कगहन) म्हणजे 'संशयाचे जंगल', चूळनिद्देसानुसार (२६९) 'तक्कवड्ढन' (तर्कवर्धन) म्हणजे 'संशय बळावणं', तर अंगुत्तर- निकायातील (२.१९३) 'तक्कहेतु' (तर्कहेतु) म्हणजे 'संशयाचं कारण'. एकूण तर्काधिष्ठितता ही संशयातीतता नाही हीच धारणा प्रामुख्यानं आढळते. बुद्धवचनांच्या संग्रहाला त्रिपिटक म्हणतात. वेदांवर सायणाचे भाष्य आहे तसं त्रिपिटकाच्या अनेक भागांवर बुद्धघोषाच्या अर्थकथा (पालि-अट्ठकथा म्ह. व्याख्या आहेत.) त्यात दीघनिकायावरील सुमंगलविलासिनी या अट्ठकथेत (रोमन संस्करण Pali Text Society. London.ed DA.I..106). बुद्धघोष चार प्रकारच्या तार्किकांचा निर्देश करतो ते असे. १) अनुस्सुतिको तक्किको (आनुश्रुतिकः तार्किकः) २) जातिस्सरो त० (जातिस्मर) ३) लाभी कः (लाभी ता०) ४) सुद्धतक्किको (शुद्धतार्किकः)

याची जी उदाहरणे दिली आहेत त्यावरुन मात्र असे स्पष्ट होते की 'विशुद्ध तार्किकाला' बौद्धपरंपरेत विरोध नाही. विरोध आहे तो एक ते तीन या क्रमांकांच्या तार्किकांना. कारण त्यांचा आधार १)अनुश्रुति (ऐकीव माहिती) २) पूर्वजन्मीचे स्मरण (ज्याचा भरवसा देता येत नाही.) व ३) आज आपण सुखी आहोत तसेचे भविष्यात असू व भूतकाळात होतो असा 'भूत' व 'भविष्य' आत्मसत्तेचे (म्ह.अस्तित्वाचे) गृहीत मान्य करून स्वतःस "सुखाचा लाभ" होता, आहे व असणार असा तर्क करुन एकापरीनं आत्मवंचना करण्याचा प्रकार आहे. चवथा शुद्धतार्किक मात्र 'हे असेल तर ते असेल; हे असेल तर ते असणार नाही', असा कारणकार्य किंवा 'प्रत्यय-फल' या शास्त्रीय दृष्टीनं विचार करणारा असतो.

**संग्रहग्रंथांसाठी 'तर्क' या शब्दाचा वापर कां?**

संस्कृतच्या विद्यार्थ्यांना न्यायशास्त्राचं









अनुक्रमणिका

सुबोधरीतीने ओळख करून देणाऱ्या संग्रहवजा (manuals) ग्रंथांच्या नामकरणात 'तर्क' हा शब्द कां वापरतात असा प्रश्न सहजच तर्काच्या 'संशयात्मक', दोषपूर्ण, अनैकान्तिक पृष्ठभूमीवर मनाला पडेल. अन्नंभट्टाचा विख्यात तर्कसंग्रह व त्यावरील त्याची स्वोपज्ञा तर्कदीपिका, केशवमिश्रप्रणीत तर्कभाषा, लौगाक्षि-भास्कर-कृत तर्ककौमुदी, जगदीशाचे तर्कामृत, तर्कवल्ली यात तर्काला उघडउघड महत्त्व दिल्याचं दिसतं. हे कसं काय? याचं उत्तर दीपिकाकार व इतर फार वेगळं असं देतात. येथील तर्क शब्दाचा कर्मणि अर्थ दाखवून "तर्क्यन्ते प्रतिपाद्यन्ते द्रव्यादिसप्तपदार्थाः यत्र स तर्कसंग्रहः" थोडक्यात तर्क म्हणजे नैयायिक वैशेषिक या समानतंत्राला अभिप्रेत असलेल्या मूळ सात पदार्थांची थोडक्यात केलेली सुबोध चर्चा. खरं तर 'सप्तपदार्थी' हेच या ग्रंथांचं खरं स्वरूप आहे.

## तर्क हा एक अयथार्थ अनुभव :

योगशास्त्राने 'वितर्क' ही तान्त्रिकी संज्ञा निन्दापरतेने वापरली आहे तसंच तर्कसंग्रहादी न्यायविषयक संग्रहग्रथांनी तर्काला अयथार्थ अनुभवाच्या तीन प्रकारातील एक प्रकार मानला आहे. "अयथार्थानुभवस्त्रिविधः संशय-विपर्यय-तर्कभेदात्।" तर्काचे निरूपण करताना "व्याप्यारोपेण व्यापकारोपस्तर्कः" असं करून त्याचं उदाहरण म्हणून "यदि वह्निर्न स्यात् तर्हि धूमोऽपि न स्याद्" हे दिलं आहे. तांत्रिक बुद्धी नसणाऱ्याला हे फार अजब वाटेल. 'आग नसली तर धूर नसेल' यात अयथार्थ काय? हे तर यथार्थच म्हणायला हवं. पण यातील 'आरोपण' हे न्याय-वैशेषिकांच्या यथार्थवादाला (Realism) विरोधी जातं. त्यांच्या मते 'जर आग नसेल तर' हा वस्तुस्थितीचा विपर्यास आहे कारण वस्तुस्थितीप्रमाणे 'आग असतांना' 'आग नसेल तर' याला यथार्थवादात स्थान नाही. हा आरोप प्रत्यक्षानं बाधित होतो. हाच प्रकार चतुर्विध अभावातील अन्नंभट्टानं सादर केलेले अत्यन्ताभावाचं 'इह भूतले घटो नास्ति' या मिळमिळीत उदाहरणाची असमर्पकता आपल्या सामान्य बुद्धीला जाणवते. आपल्यातला खटयाळपणा म्हणा, बंडखोरपणा म्हणा वा छिद्रान्वेषीपणा म्हणा आपल्याला चेतावतो. त्या भूतलावर ताबडतोब एक त्या भूतलावर ताबडतोब एक घट ठेवून यावं व तेणेकरुन घट व भूतल यांमधील त्रैकालिकसंसर्ग-अवच्छिन्न-प्रतियोगिताकत्त्व संपुष्टात आणावं असा विचार बळावतो. प्रतियोगी म्हणजे Counter-entitity भूत, वर्तमान व भविष्य या तिन्ही काळात पूर्ण अभावानंच भूतलाशी संसर्ग ठेवतो. (म्हणजे भूतल व घट यांचा तिन्ही काळात संसर्ग होत नाही) हे कसले फुसकं उदाहरण? अत्यन्ताभावासाठी खपुष्प, वन्ध्यापुत्र, शशशृङ्ग ही अन्नंभटाला सुचू नाहीत काय? अन्नंभट्ट मात्र या पृच्छेमुळं हसेल, आपली कीव करेल. कारण उघड आहे. त्याच्या समजामध्ये एक भूतल असा आहे की जेथे पूर्वी कधी घट नव्हता, आताही तो नाही व भविष्यातही कधी असणार नाही. इथे तो 'आरोपण' मानत नाही; वस्तुस्थिती मानतो. ती वस्तुस्थिती आपण त्याला खोटं ठरवण्यासाठी बदलायची नाही. 'इह भूतले घटः नास्ति' हे न्यायास अभिप्रेत असणारं एक उद्देश्य-विधेयसंपन्न विधान Proposition आहे. न्यायशास्त्र हे व्याकरणासारखे शब्दशास्त्र वा पदशास्त्र नाही; ते मीमांसेसारखे वाक्यशास्त्र आहे. पूर्ण वाक्य वा विधान या स्वरूपात आपल्याला अभिप्रेत असणारी अत्यन्ताभावाची समर्पक वाटणारी उदाहरणे पुढे आली पाहिजेत. यावरून हे कळेल की.. १. इह भूतले घटो नास्ति हे वाक्य व २.इह वन्ध्यायाः सुतो नास्ति ३. इह खे पुष्पं नास्ति ४. इह शशस्य शृङ्गे न स्तः।

ही सर्व वाक्ये समसमान होतात. खटाटोपी माणसे वाळूत रोपे लावू लागलीच आहेत. यापुढे आकाशात अवकाशयानाचे स्थानकं उभारून त्यांनी तेथे फुले उगवून ती स्थानकं सुशोभित केली तर 'ख-पुष्प' हे ही फारसे अत्यन्ताभावाचे समर्पक उदाहरण ठरणार नाही.

एकूणच 'तर्क' ही बुद्धीची trick आहे. त्याचा मूळ अर्थ 'फिरवणं' turning किंवा मुरडणे twisting असा आहे. युरोभारतीय उत्प्रेक्षित धातू treik असा आहे.

लॅटिन intricare गुंता करणे, trick शब्दजाल puzzle. पालीत याला एक अजब पर्याय आहे. 'दिट्ठि' जी अधिकरून सम्मा (योग्य) असण्यापेक्षा 'मिच्छा' (खोटी) च जास्ती असते. अशा साठ खोट्या तत्त्वसंकल्पनांचं जाळं दीघनिकायाच्या ब्रह्मजाल "A perfect Net" या पहिल्याच सूत्रात आपल्याला आढळते.

वाक्यपदीयकार भर्तुहरी व भव्य वगैरे बौद्ध ग्रंथकार यांच्या तत्त्वविवेचनात लक्षणीय साम्य आहे. वैदिक हे 'वेद' जसे 'स्वत:प्रमाण' मानतात तसेच बौध्दांना 'बौद्धागम' हे स्वत:प्रमाण आहेत असं मानतात. मनु ज्या प्रमाणे 'वेदशास्त्र-अविरोधी' तर्क धर्माच्या बाबतीत प्रमाण मानतो तसंच भव्य म्हणतो-

तत्त्वस्यातर्कगोचरात् तत्त्वबोधो नानुमानतः।
नातस्तर्केण धर्मा, गह्येत धर्मतेतिच॥
इहानुमानान्निर्दोषात् आगमानुविधायिनः॥
(MHK. V. 104-105)

(तत्त्व हे तर्काच्या क्षेत्रात येत नाही. सबब तत्त्वाचा बोध अनुमानप्रमाणानं होत नाही. मात्र आगमांचा अनुसार करणारी अनुमाने निर्दोष असतात.) भव्य पुढे असंही म्हणतो की -

अतोऽनुमानविषयं न तत्त्वं प्रतिपद्येत।
तत्त्वज्ञानविपक्षो यस्तस्य तेन निराक्रिया॥

ज्या अर्थी तत्त्वबोध हा अनुमानाचा विषय नाही, किंबहुना तो तत्त्वज्ञानाचा विरोधक पक्ष आहे त्या अर्थी तत्त्वज्ञानानेच तर्काचा निरास होतो. न्यायवादी प्रामाणिक असतो; प्रमाण मानतो. 'प्रमा' म्हणजे अबाधित ज्ञान. या प्रमाणशब्दापासून फारसी 'फर्मान' हा शब्द तयार झाला हे सांगितल्यावर तर्कतीर्थांना फार काही वाटले नाही पण एका खास पेयाचंच माप असणारे सुंदर काचेचं 'मापक-पात्र' हे "पैमाना" म्हणून प्रसिद्ध आहे असं म्हटल्यावर मात्र खुललेल्या चेहेऱ्याच्या 'आबां' नी माझ्या पाठीवर प्रेमळ थाप मारून आता आपण 'तर्कातीत' अवस्थेचा अनुभव घ्यायलाच हवा असंच जणू सुचवलं!

***

## * चर्चासत्र *

जानेवारी ते एप्रिल २००६ च्या जोड अंकातील विषयावर प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई येथे २९ व ३० सप्टेंबर २००६ रोजी चर्चासत्र आयोजित करण्यात आले आहे. सहभागी होण्यात रस असणाऱ्यांनी प्रा. यशवंत कळमकर, सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याशी संपर्क साधावा.

दूरध्वनी क्र.

कार्यालय : (९५२१६७) २२०००६

निवास : (९५२१६७) २२२७०४





अनुक्रमणिका

हे मासिक घ. वा. जोशी यांनी श्री प्रिंटर्स, १५३१, रविवार पेठ, वाई, जि. सातारा ४१२ ८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.










अनुक्रमणिका